# वक्तृत्वकलाविवेचन.

हें पुस्तक

## काशिनाथ त्रिंबक खरे,

ह्यांनीं केलें.

---

### आर्या.

बव्हर्थ जनमनोहर स्वल्पाक्षर मधुर सत्य बोलावें ।
ज्या सद्वाक्यश्रवणें श्रोत्यांचें चित्त शिरहि डोलावें ॥

**मोरोपंत.**

---

**मुंबईमध्यें**

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

इ० सन १८८७.

किंमत ६ आणे.

# प्रस्तावना.

ह्या धाकट्या पुस्तकास प्रस्तावना लहान बरी शोभेल, असें वाटल्या-वरून ती संक्षेपानें योजिली आहे. ह्या पुस्तकास 'वक्तृत्वकलाविवेचन' हें नांव दिलें आहे. त्यावरून सभेपुढें वक्त्यानें बोलावें कसें, ह्या गोष्टी-चेंच पुस्तकांत वर्णन आहे, असें लक्षांत येईल. ह्याची रचना अशी केली आहे कीं, प्रथम उपोद्घात, नंतर वक्तृत्वकलेचें निरूपण, व त्यानं-तर पुस्तकाचा उपसंहार; असे मुख्य तीन भाग करून ते क्रमानें दिले आहेत. याप्रमाणें मुख्य विषय आटपल्यावर, नमुन्याकरितां निरनिरा-ळ्या विषयांवरील तीन भाषणें दिलीं आहेत. व शेवटीं विषयाचा उप-क्रम व उपसंहार कसा असतो ह्याचा स्पष्ट बोध होण्याकरितां, विषयाचें विवेचन गाळून, फक्त उपक्रम व उपसंहार ह्यांचीं उदाहरणें देऊन, पुस्त-क समाप्त केलें आहे. ह्या लहान पुस्तकाच्याद्वारें, नवीन होतकरू वक्त्यांस भाषण करण्याचा थोडाबहुत मार्ग कळेल अशी समजूत आहे. ह्या अतिमहत्त्वाच्या विषयावर, विद्वान व भाषाभिज्ञ अशा पुरुषांनीं लेख लिहिल्यास, तो अधिक उपयोगी पडेल हें उघड आहे. पण तसा सुदिन प्राप्त होईपर्यंत, ह्या अल्प सेवेचा लोकांस कांहीं उपयोग होऊं ला-गल्यास, केलेल्या श्रमाचें सार्थक्य झालें असें वाटेल.

हें पुस्तक तयार करण्यास, वेदशास्त्रसंपन्न रा० रा० गोविंद शंकर शास्त्री बापट, रा० रा० लक्ष्मण रामचंद्र वैद्य एम. ए. एल. एल. बी., व रा० रा० विनायक कोंडदेव ओक, ह्यांनीं कृपा करून फार साह्य केलें, त्याबद्दल मी त्यांचे फार उपकार मानितों. अशा विषयावर लेख लिहि-ण्याची माझी योग्यता नसतां, हातीं घेतलेलें काम परमेश्वरकृपेनें तडीस गेलें, ह्मणून सर्वेश्वराची स्तुति करून ही प्रस्तावना संपवितों.

मुक्काम मुंबई, तारीख २३ नवंबर, सन १८८७.

काशिनाथ त्रिंबक खरे.

# अनुक्रमणिका.

खात्री करून दिली पाहिजे, आणि त्यांचीं मनें ही वळविलीं पाहिजत. तात्पर्य, अशा अनेक प्रकारच्या उपयुक्त कामांबद्दल लोकांची खात्री करून, त्यांचीं मनें आपणांस चांगल्या कार्याकडे लागण्यास प्रवृत्त करावयाचीं आहेत. वर दर्शविलेले अडचणीचे प्रसंग, आपल्या सन्निध जसजसे येऊन भिडतील, त्या त्या मानानें सर्व ठिकाणीं जे खरे वक्ते असतील, ते लपून न राहतां धैर्यानें पुढें सरसावतील. आणि आपल्या वाणीच्या प्रभावानें, प्रसंगानुरूप करामत करून लोकहिताचें साधन संपादन करतील, यांत संशय नाहीं. असो. मनुष्यवाणीचें मुख्य कार्य कोणतें, व वक्तृत्वकलेचा महिमा काय, ह्याविषयीं आतां आपण विचार करूं.

---

## मनुष्यांच्या वाणीचें मुख्य कार्य.

वाचेनें बोलणें, व आपला भावार्थ तोंडच्या शब्दोच्चारांनीं दुसऱ्यास सांगणें, ह्या क्रियेस वाणी किंवा वक्तृत्व असें ह्मणतात. सर्व बोलक्या माणसांच्या मुखांत परमेश्वरानें ही शक्ति निर्मिली आहे. तिच्या योगानें सगळे उद्योग चालविण्यापुरता आपण परस्परांशीं वाक्व्यवहार करितों. मनुष्यांच्या ठायीं ही शक्ति निर्मिली नसती तर, आपणास पदोपदीं अनेक अडचणी सोसाव्या लागल्या. मुक्या माणसांस इतरांप्रमाणें सर्व अवयवादि शारीरिक अनुकूलता असून, बोलक्या माणसांसारख्या सर्व कल्पना ही मनांत घोळत असतात. पण, त्या तोंडावाटे बाहेर काढण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें, मुक्यांचा वर्ग फार अडचणींत पडून दीन झाला आहे. ही गोष्ट नेहमीं सर्वांच्या दृष्टीस पडते. मानवांस ह्या एका वाणीची न्यूनता असती, तर आपणास आजची स्थिति प्राप्त न होतां, केवळ पशुतुल्य स्थितींत राहावें लागलें असतें; पण आपणांवर परमेश्वराची मोठी कृपा असल्यामुळें, आपणांस त्याणें उत्कृष्ट वाणी दिली आहे. तिचा आपण वाईट कामांत उपयोग करूं नये. चांगलीं कामें घडून येतील अशा उपयुक्त कार्यांतच वाणीचा उपयोग करावा, हें बोलक्या मनुष्यांचें कर्तव्य आहे.

मनुष्यांमध्यें बोलण्याची शक्ति बीजासारखी अल्प आहे. तरी ती अभ्यासानें पाहिजे तितकी वाढवितां येते. तिजवर चांगली करामत करून, उत्तम वळण लावण्याचे, व वक्तृत्वशक्ति वाढविण्याचे, दृढ परिश्रम केले तर, वटवृक्षाप्रमाणें तिला पुष्कळ व्यापकता व विस्तीर्णता प्राप्त होते.

अशा रीतीनें तयार केलेल्या वाणीच्या द्वारें, हजारों लोकांस सन्मार्गाकडे वळण्याविषयीं बोध केल्यास, त्यांचीं मनें लवकर वश होऊन, वक्त्यांच्या उपदेशाप्रमाणें वागण्यास सिद्ध होतील.

ज्यांना लिहितां वाचतां मुळींच येत नाहीं, अशा अज्ञ जनांवर सुविचारज्ञानाची प्रेरणा करण्यास, ग्रंथाचा बिलकूल उपयोग होत नाहीं. अशा गरीब व अज्ञान समूहास सुबोध करून, उन्नतमार्गी लावण्यास वाक्चातुर्य हें साधन फार सुलभ होय. हजारों मनुष्यांचीं मनें अल्प कालांत एकचित्त करून, पाहिजे त्या इष्टकार्यास लागण्याविषयीं प्रवृत्त करणें, हें ह्या वाक्देवतेच्या आंगीं विलक्षण सामर्थ्य आहे. तिच्या साह्यानें युरोपांतील कित्येक चतुर वक्त्यांनीं, आपल्या वाणीच्या बलानें हजारो लोकांस अल्प कालांत मोहित केलें. आणि त्यांजकडून मोठीं अवघड अशीं लोकहिताचीं अनेक कामें करून घेतलीं. असली वाक्देवता आमच्या देशांतील लोकांस प्रसन्न झाली तर, तिच्या साह्यानें आमचें सर्व दैन्य दूर करतां येईल. याकरितां ही देवता आपणांस कोणत्या उपायानें प्रसन्न होईल, तो मार्ग शोधून काढण्याचा आतां आपण प्रयत्न करूं.

## वक्तृत्वकलेचा महिमा.

बहुलोकसमाजापुढें उभें राहून योजलेल्या विषयावर, अव्यवस्था न होतां, संगतवार व स्पष्ट असें भाषण करणें, ह्यास वक्तृत्वकला किंवा वाक्चातुर्य असें ह्मणतात. श्रोत्यांची खात्री करून त्यांचीं मनें वळवून घेण्यास, ही कला फार उपयोगीं पडते. ह्मणून ती यथाशक्त्या संपादन करणें हें मनुष्यांस भूषणप्रद आहे. वक्तृत्वकला उत्कृष्ट साधण्यास अनेक गुण संपादावे लागतात. तितके सर्व अनुकूल झाले, तरच चांगलें बोलतां येतें. तशा उत्तम वक्त्याच्या भाषणाची श्रोत्यांवर मोठी छाप बसते. तेणेंकरून हजारों श्रोते आपल्या मनांतले कुतर्क व दुराग्रह टाकून, वक्त्यास अनुकूल होतात. आणि त्याच्या मतास पूर्णपणें येऊन मिळतात. असा ह्या वाक्चातुर्याचा महिमा अतिश्रेष्ठ आहे. ही कला फार उपयोगाची आहे खरी, पण ती उत्कृष्ट साध्य होणें हें फार कठिण आहे. ह्मणूनच 'वक्ता दशसहस्रेषु' असें वाक्य आपल्या लोकांत प्रसिद्धीस आलें आहे. तथापि 'शिकेल त्याची विद्या' ह्या ह्मणीप्रमाणें उद्योगी पुरुषांनीं झटून अभ्यास केल्यास, ती साध्य होण्याजोगी आहे.

आपल्या देशांत अर्वाचीन काळीं, साधारण व्यवहारी भाषेंत उत्तम बोलणारे वक्ते, निपजल्याचा कोठें दाखला दिसत नाहीं. याचें कारण जिकडे तिकडे धामधूम, व परराज्यसत्तेची भीति फार असल्यामुळें उघड-पणें बोलण्याची कोणास सवड व छाती होत नसावी असें वाटतें. परंतु पुरातन काळीं, आपल्या देशांत वक्तृत्वकला उत्तमावस्थेस पोंचली होती, असें दाखविणारे प्रसंग अनेक ग्रंथांत वर्णिले आहेत. द्रौपदीवस्त्राहर-णाच्या दुर्धर प्रसंगीं, कौरवसभेपुढें विकर्णानें उभें राहून भाषण केलें. त्यांत अन्यायानें साध्वी द्रौपदीस सभेपुढें आणून तिची विटंबना केल्याबद्दल, राजा दुर्योधन व त्याचे दुष्ट सोबती ह्यांचा निषेध केला. ह्या दुष्ट वर्त-नाबद्दल तुह्मांस लवकर शासन होईल असेंही स्पष्ट सांगितलें. याप्रमाणें रावणसभेंतील अंगदशिष्टाईचें भाषण, व कौरवसभेंतील कृष्णशिष्टाईचें भाषण, हीं बोधकारक, आवेशयुक्त, व भयदर्शक, अशीं आहेत. यावरून आपलेकडे प्राचीन काळीं वक्तृत्वकला चांगली उदयास आलेली होती, असें दिसतें.

प्राचीन काळीं युरोपखंडांत 'दिमास्थनीस' व 'सिसरो' इत्यादि नामांकित वक्ते होऊन गेले. त्यांच्या वक्तृत्वगुणाची कीर्ति अजरामर होऊन बसली आहे. त्यांच्या देशांतले लोक चैनी, आळशी, व उदा-सीन होऊन निःकाळजी राहिल्यामुळें परशत्रु प्रबल झाले. त्यांनीं आ-पलीं मोठालीं सैन्यें तयार करून, ह्यांच्या शहरवेशीजवळ आणून भिडविलीं. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं आतां कसें करावें, ह्या विचारासाठीं पुष्कळ लोक एकत्र जमले. त्या बहुलोकसमुदायापुढें, ह्या थोर वाक्चतुर पुरु-षांनीं अनेक वेळां भाषणें केलीं. त्या योगानें श्रोतेजनांस शिथिलता आली होती ती नाहींशी होऊन, त्यांस मोठा आवेश चढला. आणि स्वदेशाचें रक्षण करणें हेंच आपलें मुख्य कर्तव्य अशी त्यांची वृत्ति बनली. स्वतंत्र-तेपुढें आपलीं तनु मन व धन हीं सर्व तुच्छ आहेत, अशी त्यांची खात्री झाली. ह्मणून स्वदेशकार्यार्थ तीं सर्व अर्पण करण्याचा निश्चय करून, शत्रूंशीं ते मोठ्या आवेशानें लढण्यास सिद्ध झाले. ज्या पुरुषांनीं आ-पल्या वाक्चातुर्यानें, हजारों लोकांचीं मनें अति अल्पकालांत अशीं बनवून सोडलीं, ते थोर पुरुष वक्तृत्वकलेंत किती निपुण असतील, ह्याचें वाचणा-ऱ्यांनींच अनुमान करावें.

आपल्या देशांत मराठी राज्याच्या वेळीं, शाहूमाहाराजांच्या कारकीर्दीत, अशीच एक चमत्कारिक गोष्ट घडलेली आहे. नवे मुलुख संपादन करण्याच्या हेतूनें, दक्षिण हिंदुस्थानांत व उत्तर हिंदुस्थानांत, मराठ्यांची फौज दरसाल स्वारीस जात असे. एके वेळीं दक्षिणेकडे स्वारी करावी, किंवा उत्तरेकडे करावी, याविषयीं, प्रधानमंडळांत मतभेद होऊन वाद पडला. त्याच्या निर्णयाकरितां सर्व सरदार, मानकरी, सेनानायक, व अष्टप्रधान, आदिकरून सर्व मुत्सदी लोकांची सभा सरकारवाड्यांत भरली. त्या सभेपुढें छत्रपति माहाराजांच्या हुजूर, बाजीराव बल्लाळ पेशवे यांणीं भाषण केलें. त्यांत, दक्षिणेकडे स्वारी करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. उत्तर हिंदुस्थानांत स्वारी करण्यास सोई फार आहेत. तिकडे सुपीक व विस्तीर्ण असा मोठा प्रदेश हातीं लागण्याचा संभव आहे. मुसलमानबादशाही दरबार, पोकळ होऊन त्यांच्यांत दुफळी माजून फाटाफूट झाली आहे. अशा वेळीं आपण उत्तर हिंदुस्थानावर स्वारी केल्यास, मराठी राज्यास मोठा लाभ खचीत होईल, यास्तव माझ्या विनंतीचा सर्वांनीं नीट विचार करून मग काय तो निश्चय करावा. अशा प्रकारें भावी लाभाची खात्री पटण्याजोगा, आपला अभिप्राय स्पष्ट व मोठ्या चातुर्यानें, सर्वांच्या मनांत फार सुरेख रीतीनें भरविला, तेणेंकरून सर्वांची खात्री होऊन सर्वांनीं बाजीरावाच्या ह्मणण्यास रुकार दिला. त्या अन्वयें माहाराजांची आज्ञा होऊन, उत्तर हिंदुस्थानाकडे फौज चालती झाली. सारांश प्रसंगानें गुणांची वृद्धि होते, हें या दृष्टांतावरून स्पष्ट दिसण्याजोगें आहे.

इंग्लंडांत मि० पिट, मि० बर्क, व लॉर्ड मेकाले, इत्यादि नामांकित वक्ते प्रसिद्धीस येऊन गेले. त्याप्रमाणें मि० ग्ल्याडस्टन, व मि० ब्राइट, इत्यादि श्रेष्ठ वक्ते हल्लीं जिवंत आहेत. त्यांच्या भाषणाची शैली फारच वर्णनीय आहे. पार्लमेन्टच्या सभासदांची निवड होतेवेळेस, पुष्कळ लोकांचीं मतें आपल्या पक्षास मिळवून घेण्याची फार जरूर असते. तेव्हां अनेक शहरीं हजारों लोकांपुढें यांचीं भाषणें होतात. तीं ऐकून विरुद्ध पक्षाकडील लोकांचीं ही मनें मोहित होऊन वश होतात, आणि ते यांच्या पक्षास भराभर येऊन मिळतात. एखाद्या महत्त्वाच्या गोष्टीचा पार्लमेन्ट सभेत वाद पडला, ह्मणजे निर्णयाच्या वेळीं ह्या वक्त्यांचीं भाषणें होतात. तीं ऐकण्याकरितां तेथें अगोदर, आठ आठ दिवस लोक बसण्याच्या

जागा आंखून ठेवतात. ह्यामुळें पार्लमेन्टांत अतिशय गर्दी होते. तरी धक्केबुक्के खाऊन त्या अत्युत्तम वक्त्यांच्या भाषणश्रवणाचा लाभ मोठ्या हौसेनें लोक साधित असतात. यावरून विलायतेंत वक्तृत्वकला किती उन्नतीस पोंचली आहे, व तिच्या द्वारानें केवढालीं महत्कार्यें घडून येता-हेत हें कळून येईल.

असल्या आणीबाणीचे प्रसंग आमच्या देशांत नसल्यामुळें व्यवहारी भाषेंत वक्तृत्वकला वृद्धि पावली नाहीं; तथापि ह्या कलेचें रक्षण आपले-कडे निराळ्या रूपानें होत आहे, ही गोष्ट संतोषदायक होय. पुराणिक आणि कीर्तनकार यांच्या ठिकाणीं ह्या कलेचें अनेकवार दर्शन होतें. एखादा पुराणिक किंवा हरिदास चांगला वक्ता असला ह्मणजे तो आपल्या वाणीनें वाक्चातुर्य दाखवितो. त्याचीं सर्व कथानकें पारमार्थिक विषयावर किंवा पुराणप्रसिद्ध इतिहासपर गोष्टींवरच असतात. तरी त्याचें वर्णन करतांना वाणीच्या प्रभावानें मोठा जनसमुदाय मोहित करून त्यास कांहीं काल-पर्यंत भिंतीवरील चित्रांप्रमाणें ते स्तब्ध करून सोडतात. सुखदुःखाच्या प्रसंगाचें वर्णन करतांना मार्मिक व चतुर हरिदास अशा खुबीनें बोलतात कीं, तें ऐकून सर्व श्रोत्यांच्या नेत्रांतून ढळढळा अश्रु वाहतात ! ! ! हें सर्वां-च्या नेहमीं अनुभवास येतें. असली वाक्देवता ज्यांस प्रसन्न असेल, त्या पुरुषांनीं अज्ञ जनांस उपयुक्त विषयावर बोध केला असतां त्यांच्या मनावर लवकर संस्कार होऊन त्वरेनें कार्यसिद्धि होऊं लागेल. दुर्व्यसनाच्या छंदास लागलेले व आळसानें विपत्तिग्रस्त झालेले लोक लवकर शुद्धीवर येतील, आणि नीतिमान् व उद्योगी बनून चांगल्या पंथास लागतील. याकरितां अशा प्रकारचे उत्तम वक्ते आपणांमध्यें तयार होऊन ते उपदेशाच्या कामास लागले पाहिजेत.

कांहीं पुराणिक व हरिदास हे चांगले वक्ते असतात खरे, तरी त्यांच्या हातून केवळ पारमार्थिक संबंधाचा मात्र लोकांस बोध होतो. संसारी ज-नास ऐहिकसंबंधानें कल्याण करून घेण्याचे मार्ग कोणते व त्याकरितां आपण काय काय केलें पाहिजे, ह्या गोष्टींचा त्यांजकडून बोध होत नाहीं. काळदेशवर्तमान पाहून आपल्या देशाची व लोकांची स्थिति नीटपणें विदित केली पाहिजे, आणि प्रस्तुत जीं जीं कर्तव्यें करण्याविषयीं लोकप्रवृत्ति क-रण्याची अपेक्षा आहे, तशा कृत्यांवर लोकांस चांगलीं व्याख्यानें दिलीं

पाहिजेत. ती कामगिरी करण्याचें सामर्थ्य प्रस्तुतच्या पुराणिकांत व हरिदासांतही दिसत नाहीं. तें कामच वेगळें आहे, याकरितां हें काम आस्थापूर्वक चांगल्या रीतीनें करण्याजोगा स्वतंत्रपणें वक्त्यांचा वर्गच तयार झाला पाहिजे. त्यावांचून हें काम सुरू होण्याजोगें नाहीं.

ह्या वर्णनावरून वाक्चातुर्याचा महिमा काय आहे, इतर देशांत ह्या कलेमध्यें लोक किती प्रवीण झाले आहेत, व तिच्या योगानें केवढालीं मोठमोठीं कार्यें घडून आणताहेत, हें समजून येईल. आतां, आमच्या देशांत ह्या कलेमध्यें आपण किती मागें पडलों आहों, व त्या कमीपणामुळें आपल्या लोकांची केवढी हानि होत आहे, हें शोधक व विचारी मनुष्यांस सहज कळण्याजोगें आहे. ह्मणून तें सांगण्याची गरज नाहीं. तथापि सर्व देशबांधवांस हात जोडून विनंति आहे कीं, ह्या कामीं आपण औदासिन्य टाकून द्या; आपलेकडे चांगले वक्ते तयार करण्याच्या उद्योगास लागण्याची वेळ आली आहे, ती व्यर्थ घालवूं नका; लवकर उद्योग सुरू केला तर, चांगले बोलणारे वक्ते तयार होऊन, देशकार्यास लागतील; आणि मग अज्ञान देशबांधवांवर उपयुक्त ज्ञानाचा प्रसार करण्याचा जो आपला इष्ट हेतु आहे, तो त्यांच्या द्वारानें लवकर सिद्धीस जाऊं लागेल. यास्तव आतां विलंब लावूं नये, एवढीच प्रार्थना आहे.

---

## वक्तृत्वकलेचें निरूपण.

### श्लोक.

तद्वक्ता सदसि ब्रवीतु वचनं यच्छृण्वतां चेतसः
प्रोल्लासं रसपूरणं श्रवणयोरक्ष्णोर्विकासश्रियम् ॥
क्षुन्निद्राभयदुःखकालगतिहृत्कार्यांतरप्रसृतिं-
प्रोत्कंठामनिशं श्रुतौ वितनुते शोकं विरामादपि ॥

वरील श्लोकांत वक्त्याच्या भाषणानें श्रोत्यांवर कोणते परिणाम घडावे हें सांगितलें आहे.:—वक्त्याचें रसभरित भाषण श्रोत्यांच्या कानीं पडल्याबरोबर मन उल्हासित व्हावें, डोळे प्रफुल्लित व्हावे, क्षुधा, निद्रा, भय आणि दुःख हीं नाहींतशीं व्हावीं, वेळ किती निघून गेला ह्याचें भान राहूं नये, इतर व्यवधानांचा विसर पडावा, आणि होत असलेलें भाषण अति उत्कंठेनें व एकाग्रतेनें ऐकून, आनंदमय झालेलें मन, भाषण संपतांच दुःखी व्हावें.

कोणत्याही गोष्टीविषयीं आपले मनांत जे विचार आले असतील ते स-
र्व सांगून दुसऱ्या लोकांच्या मनांत भरविणें, आणि आपल्या मनाप्रमाणें
त्यांच्या मनांची खात्री करून देणें, यास निरूपण ह्मणतात. आपण नेहेमीं
एकमेकांशीं बोलतों त्यांत आज्ञा, प्रश्न आणि निरूपण, असे तीन प्रकार
असतात. कोणतेंही काम करण्याची सूचना अगर आज्ञा करितों, त्या बोल-
ण्यास आज्ञार्थी बोलणें ह्मणतात. उदाहरण—वेळ झाली स्नानाला चला, दाहा
वाजतां हजीर व्हा, तहान लागली पाणी द्या, इत्यादि, वाक्यांत सूचना व
आज्ञाच आहेत. कोणत्याही कामाबद्दल आपण दुसऱ्यांस कांहीं विचारितों,
अशा बोलण्यास प्रश्नार्थक बोलणें ह्मणतात. उ० आतां किती वाजले ?
जेवण झालें का ? आज वार कोण ? इ० प्रकारच्या भाषणांत दुसऱ्यांकडून
आपणांस उत्तर मिळावें असा हेतु असतो, ह्मणून त्यास प्रश्न ह्मणतात.
दुसऱ्यानें विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर देणें, किंवा आपण होऊनच एखादी
गोष्ट दुसऱ्यास सांगणें, अशा बोलण्यास निरूपण ह्मणतात. उ० पुढील
वर्षीं ग्रहण मुळींच नाहीं, कालचें कीर्तन फार उत्तम झालें, मी उद्यां पु-
ण्यास जाणार, इ० बोलण्यांत आज्ञा किंवा प्रश्न नाहीं, केवळ आपल्या
मनांतला हेतु दुसऱ्यास कळविण्याचा उद्देश आहे, ह्मणून ह्यांस निरूपण
ह्मणतात. आपण नेहेमीं एकमेकांशीं बोलतों, त्यांत विवेचनपर भाषण
करण्याचा प्रसंग फार असतो. लहान मुलें प्रथम बोलायला शिकतात,
तेव्हां त्यांस आज्ञार्थक व प्रश्नार्थक, बोलणें अगोदर येतें. कारण तशा
बोलण्याचें कार्य थोड्या शब्दांनीं होतें; आणि तितके अल्प शब्द
मुलांच्या ध्यानांत लवकर राहूं लागतात. आज्ञा आणि प्रश्न, या अ-
र्थाच्या भाषणांत, आपला हेतु दुसऱ्यास कळवावयाचा मात्र असतो. त्यास
फार शब्द लागत नाहींत, थोड्या शब्दांनीं निर्वाह होतो.

निरूपणप्रकारास माहिती ज्यास्त लागते. कारण जी गोष्ट दुस-
ऱ्यांस कळवावयाची असते, ती त्यांस नीट समजेल अशा रीतीनें संग-
तवार कथन करितां आली पाहिजे, ऐकणाऱ्यांस त्या संबंधानें ज्या
शंका येतील त्यांचें सयुक्तिक रीत्या समाधान करण्याचें सामर्थ्य आंगीं असलें
पाहिजे, आणि एकंदरींत त्या गोष्टीविषयीं आपल्या मनांतील संपूर्ण भा-
वार्थ, दुसऱ्यांच्या मनांत भरवून त्यांच्या मनाची त्याबद्दल पक्की खात्री पटेल,
अशा रीतीनें ठसवून देतां आला पाहिजे. अशा प्रकारच्या बोलण्यास

निरूपण ह्मणतात. आज्ञा, प्रश्न व निरूपण, हे बोलण्याचे मुख्य तीन प्रकार आहेत. त्यांपैकीं निरूपणप्रकाराचें बोलणें हें कठिण आहे. सामान्य व्यवहारांत देखील, निरूपणप्रकाराचें बोलणें सर्वांस नीट साधत नाहीं. ज्याला माहिती चांगली असून, भाषणचातुर्य व समयसूचकता, इत्यादि गुण अनुकूल असतात, तोच विवेचनपर भाषण चांगलें करून ऐकणाऱ्यांस रंजवितो; आणि त्यांची नीट समजूत घालून त्यांच्या मनाची खात्री करून देतो.

वक्तृत्वकलेमध्यें निरूपणाचा प्रकार मुख्य आहे. तो साध्य करून घेण्यास कोणत्या गोष्टींचें अवधान ठेविलें पाहिजे, हें वक्त्यास चांगलें अवगत असेल तर त्याच्याकडून फार चुक्या घडतात. पण त्याविषयीं तो अज्ञ असल्यास, गैरसमजुतीनें त्याजकडून अनेक दोष घडून येतात. हें सर्वांच्या अनुभवास येतच आहे. असले दोष टाळण्याचा मार्ग सांगितल्यानें, अभ्यासी व लक्षपूर्वक वागणाऱ्या वक्त्यांस थोडेंसें तरी साह्य होईल, असें समजून वक्तृत्वकलेचें निरूपण येथें विस्तारानें देण्याचें योजिलें आहे.

वक्तृत्वकलेच्या निरूपणास वक्त्याच्या आंगीं अनेक गुण असावे लागतात. त्यांतील कांहीं स्वाभाविक असतात, व कांहीं संपादनीय असतात. वक्त्याची मूर्ति सुरेख, वर्ण गोरा, चर्या मनोहर, व वर्णोच्चार खणखणीत व दमदार असून, आवाज गोड असला पाहिजे. पण हे गुण स्वाभाविक होत. ह्यांखेरीज दुसऱ्या अनेक गुणांची वक्त्यास जरूरी आहे, ते अभ्यासानें प्राप्त करून घेतां येतात. ते चांगले संपादिले असतां वक्त्याचें कार्य होतें. तशा गुणांस संपादनीय गुण ह्मणतात.

कोणत्याही विषयावर एखाद्या मनुष्यास सभेपुढें उभें राहून भाषण करावयाचें असलें ह्मणजे, त्यास अनेक गोष्टी ध्यानांत ठेवाव्या लागतात; आणि कांहीं कृति साक्षात् कराव्या लागतात. ध्यानांत ठेवण्यासारख्या ज्या गोष्टी आहेत, त्यांस 'वक्तृत्वकलेचीं बाह्यांगें' असें ह्मणतात. आणि बोलण्यास आरंभ केल्यापासून, भाषण समाप्त होई तोंपर्यंत, ज्या कृति कराव्या लागतात, त्यांस 'वक्तृत्वकलेचीं अंतरांगें' असें ह्मणतात. ह्या दोन्ही प्रकारांची वक्त्यास चांगली माहिती असली पाहिजे. ह्मणून त्यांचें वेगळें वेगळें वर्णन दिलें आहे.

---

## वक्तृत्वकलेचीं बाह्यांगें.

**स्थलाची माहिती.**—ज्या स्थळीं बोलावयाचें असेल, त्या स्थलाची विशेष माहिती, व त्याच्या आजुबाजूच्या प्रदेशांची सामान्य माहिती, मिळेल तर मिळवावी. कारण प्रसंगोपात बोलतांना, स्थलसंबंधानें कांहीं उदाहरणें देऊन बोलण्याचा ओघ आल्यास, जवळच्या स्थलांतील उदाहरण सांगितलें असतां, तें श्रोत्यांच्या माहितीचें असल्यामुळें त्यांच्या मनांत लवकर ठसतें. तितकें दूरच्या स्थलाचें उदाहरण त्यांच्या मनांत लवकर भरत नाहीं. सर्वच ठिकाणीं असला प्रसंग येतो असें नाहीं, तथापि वक्त्यास तशी माहिती असल्यानें, समयीं मोठा उपयोग होतो. ह्मणून साधेल तर असली माहिती संग्रहास असूं द्यावी.

**लोकांची माहिती.**—ज्या लोकसमुदायापुढें बोलावयाचें असेल, त्यांचे स्वभाव, त्यांच्या रागद्वेषाच्या गोष्टी, त्यांचें ज्ञान, त्यांच्या आवडीनावडीचे विषय, व त्यांच्या आवश्यकता, इत्यादिकांची वक्त्यास चांगली माहिती असली पाहिजे. कारण, आपल्या भाषणानें प्रतिपाद्य विषयाविषयीं श्रोत्यांची खात्री करून, त्यांचीं मनें वळवावयाचीं असतात. तो हेतु साधण्यासाठीं श्रोत्यांचीं मनें वश होतील, अशा बेतानेंच बोलणें भाग आहे. लहान आणि हट्टी मुलांकडून एखादें काम करवून घ्यावयाचें असलें ह्मणजे, त्याच्या स्वभावास विरुद्ध न बोलतां, त्यास चुचकारून, व त्याच्या कलाप्रमाणें बोलून, शाहणी माता युक्तीनें त्याजकडून इष्ट कार्य करवून घेते. त्याप्रमाणें श्रोत्यांचा कल पाहून वागल्याखेरीज, वक्त्यास आपला इष्ट हेतु त्यांच्या मनांत भरवितां यावयाचा नाहीं. ह्मणून श्रोत्यांच्या गुणदोषांची, चांगली ओळख वक्त्यानें अगोदर करून ठेविली पाहिजे. ह्या गोष्टींत वक्ता अजाण असला तर, त्याला अनेक प्रकारच्या अडचणी येऊन, श्रोत्यांवर त्याची छाप बसावी तशी बसत नाहीं.

**स्वकर्तव्याचें अवधान.**—स्थल कसें आहे, व त्यांतले लोक कसे आहेत, ही माहिती वक्त्यास असावी लागते. त्याप्रमाणें आपण कसे आहों, व आपणांस मुख्यत्वें कोणती गोष्ट करावयाची आहे, हें वक्त्यानें नेहेमीं चांगलें ध्यानांत ठेविलें पाहिजे. कारण, तत्त्ववेत्ते, व कवि, ह्यांस एक एकच काम करावयाचें असतें; ह्मणजे जी गोष्ट किंवा कल्पना आपण सिद्ध केली, ती सप्रमाण खरी आहे, अशी लोकांची खात्री त्यांनीं करून दिली, ह्मणजे तत्त्व-

वेत्याची कामगिरी संपली. त्याप्रमाणेंच लोकांचीं मनें आकर्षून घेण्याचें काम कवीचें आहे; तें त्यानें केलेल्या कवितांच्या द्वारें होऊन, लोकांचीं मनें वळूं लागलीं, ह्मणजे कवीची कामगिरी झाली. परंतु मनाची खात्री करून देणें, व मन वळविणें, ह्या दोन्ही कामगिऱ्या करण्याचें ओझें, एकट्या वक्त्याच्या डोक्यावर असतें, हें बोलणाऱ्यांनीं नेहेमीं ध्यानांत ठेविलें पाहिजे. ह्मणजे आपण सांगितलेली गोष्ट खरी आहे, असें प्रमाणांनीं सिद्ध करून श्रोत्यांची खात्री करून दिली पाहिजे, व अमुक रीतीनें वागा, असें आपण सांगतों, तें सयुक्तिक, व सुलभ असून अत्यावश्यक आहे, असें श्रोत्यांस वाटून त्याप्रमाणें वागण्याविषयीं श्रोत्यांच्या मनांत हुरूप आला पाहिजे. याप्रमाणें श्रोत्यांची खात्री करून देणें, व त्यांचें मन वळिवणें, ह्या दोन्ही कामगिऱ्या करण्याचें सामर्थ्य, आपल्यामध्यें आहे कीं नाहीं, ही, वक्त्यानें स्वात्मपरीक्षा चांगली करून ठेविली पाहिजे. ती न करितां वक्ता नुसत्या आपल्या अकलेच्या घमेंडीवर राहिला तर, आयतेवेळेस फजिती होईल. हें फार ध्यानांत ठेवावें.

विषयांच्या जाति.—विषयांच्या जाति दोन आहेत. त्यांस विधि, आणि निषेध, असें ह्मणतात. ज्यांत अमुक कृति करा, असें सांगावयाचें असतें, त्यास विधिविषय ह्मणतात. आणि ज्यांत अमुक अमुक करूं नका, असें सांगावयाचें असतें, त्यास निषेधविषय ह्मणतात. विधिविषय प्रतिपादनांत त्या विषयाचें मंडण करावें लागतें; आणि निषेधविषयांत, त्याचें खंडण करावें लागतें. याकरितां आपण बोलण्यास घेतलेला विषय कोणत्या जातीचा आहे, हें वक्त्यानें अगोदर पाहून ठेवावें. ह्मणजे त्या अनुरोधानें खंडणाचीं किंवा मंडणाचीं प्रमाणें पाहून, तीं योग्य स्थळीं योजण्यास ठीक पडतें.

भाषणाचे प्रकार.—वादविवादास्पदभाषणें, उत्तेजक भाषणें, उपदेशपर भाषणें, आणि कथानक भाषणें; असे भाषणाचे प्रकार चार आहेत. त्यांचीं लक्षणें.

वादविवादास्पद भाषणें.—एखाद्या गोष्टीचा लढा पडला, ह्मणजे त्याच्या निर्णयाकरितां आपण न्यायकोर्टांत जातों. त्या ठिकाणीं दोन्ही पक्षांच्या वकिलांचीं भाषणें होतात; तीं ह्या प्रकारचीं होत. वादीचा वकील आपला दावा शाबीद करण्याकरितां, वादास्पद गोष्टीच्या मंडणाचीं, व

कायद्याच्या अनुकूलतेचीं, प्रमाणें दाखवून आपला मुद्दा स्थापित करित असतो. आणि प्रतिवादीचा वकील त्यांतील न्यूनता, खोटेपणा व कायद्याची प्रतिकूलता असेल ती दाखवून, वादीच्या पुराव्याचें खंडण करून तो दुर्बल आहे, असें सिद्ध करीत असतो. असलीं भाषणें न्यायाच्या कोर्टांत नेहेमीं होतात. सामान्य व्यवहारांत देखील परस्परांत मतभेद पडला, ह्मणजे अशा प्रकारचीं बोलणीं होऊन, वादविषयाची शुद्धि करून घेण्याचा, आपणा सर्वांस नेहेमीं प्रसंग येतो. ह्या वादविषयास सांप्रत आपलेकडे पुर आला आहे !

**उत्तेजक भाषणें.**—लढाईच्या वेळीं आपल्या सैन्यास शत्रूशीं नेटानें लढण्याचें स्फुरण यावें, ह्मणून शिपायांच्या धैर्याची, बलाची व शौर्यादि-गुणांची, स्तुति करून, त्यांस सेनापति उत्तेजक शब्दांनीं गौरवून, ईर्षा येण्याजोगें भाषण करितात. तीं ह्या प्रकारांत येतात. विद्याशाळांच्या बक्षिससमारंभप्रसंगीं, विद्यार्थ्यांस लक्षून, त्यांना शिकण्याचें उत्तेजन यावें ह्मणून, अध्यक्षांचीं भाषणें होतात, तींही याच प्रकारांत येतात. युरोप व अमेरिका, इत्यादि सुधारलेल्या राष्ट्रांत लढाईच्या वेळीं, उत्तेजक भाषणें करण्याची अद्याप वहिवाट चालू आहे; आमचेकडे मात्र सध्या लढाया नकोतशा झाल्यामुळें तसला प्रसंग येत नाहीं. पण शाळांतले बक्षिससमारंभ दरसाल अनेक ठिकाणीं होतात; त्या वेळचीं उत्तेजक भाषणें, आमच्या मुलांबाळांस देखील ऐकावयास सांपडतात.

**उपदेशपर भाषणें.**—देवालयांत व भजनालयांत, धर्मश्रद्धेनें भाविक-लोक जमतात. त्या वेळीं नीतीची व स्वधर्माची प्रशंसा करून, धर्माधिकारी, भक्तजनांस बोध करितात. तीं भाषणें या प्रकारचीं होत. मातापितरें व गुरु, आपल्या पुत्रांस व शिष्यांस, सुनीति, सदाचार व सुविद्या, संपादनाविषयीं जो बोध करितात, तीं भाषणेंही याच प्रकारांत येतात. आमच्यांतील पुराणिकांचीं व हरिदासांचीं एकंदर भाषणें उपदेशपरच असतात. हीं भाषणें, आमच्या सर्व लोकांच्या फार परिचयाचीं आहेत. ह्यांत सद्गुणाची स्तुति व दुर्गुणाची निंदा असते. त्याचप्रमाणें सदाचारी व पुण्यशील भक्तजनांचा सांभाळ, व दुराचारी दुष्टांचा नाश, परमेश्वर कसा करतो, ह्याबद्दल इतिहासपुराणांतील कथेचीं उदाहरणें दाखवून, श्रोतेजनांस बोध केलेला असतो.

**कथानक भाषणें.**—पुष्कळ देश फिरून आल्यावर, अनेक ठिकाणीं पाहिलेल्या नानाविध गोष्टींची व चमत्कारांची लोकांस माहिती करून देण्यासाठीं, जीं भाषणें होतात. तीं ह्या प्रकारचीं होत. किंवा एखाद्या शास्त्रीय विषयाची, अथवा सामान्य व्यवहारिक गोष्टींची, माहिती लोकांस देण्याच्या हेतूनें जीं व्याख्यानें होतात, तीं कथानक भाषणें होत. अशा प्रकारचीं भाषणें करण्याचा आपलेकडे प्रचार नव्हता. पण आलीकडे हा प्रकार बराच सुरू झाला आहे. सांप्रत आमच्या लोकस्थितीस असल्या भाषणांची फार गरज आहे. ह्मणून तीं चागल्याप्रकारें होऊं लागल्यास देशांत उपयुक्त ज्ञानाचा प्रसार लवकर होईल.

**भाषणाची कालमर्यादा.**—वक्त्यानें एखाद्या विषयावर बोलावयाचें, तें किती वेळांत बोलावें, ह्याची कांहीं कालमर्यादा असली पाहिजे. तशी नसली तर भाषणांस आळा रहात नाहीं. याकरितां ज्या श्रोत्यांपुढें बोलावयाचें असेल, त्यांची ऐकण्याची अभिरुचि, व समजण्याची योग्यता किती आहे, हें अनुमान लक्षांत आणून, ते समाधानवृत्तीनें बसून ऐकतील, इतक्या बेताचा विषयाचा संक्षेप करून, बोलण्यास काल नेमावा. तसें न केल्यास, विषयाचा विस्तार होऊन, बोलणें व काल अमर्याद वाढेल; तेणेंकरून श्रोते कंटाळतील, आणि मग वक्त्याचें भाषण चांगलें होत असलें तरी, श्रोते स्वस्थ चित्तानें ऐकेनातसे होतील. यामुळें बोलणाराच्या वक्तृत्वाचें व श्रोत्यांच्या श्रवणाचें उत्तम सार्थक व्हावें तसें होणार नाहीं. ह्मणून वक्त्यांनीं हें धोरण ध्यानांत ठेवून, भाषणास योग्य दिसेल तितकी कालमर्यादा करावी. परंतु, ह्या विषयाच्या आरंभीं दिलेल्या श्लोकांत वक्त्याच्या भाषणानें श्रोत्यांवर जे परिणाम घडावे ह्मणून सांगितलें आहे, ते परिणाम होत असें वाक्चातुर्य ज्यांच्या भाषणांत असेल त्यांस कालमर्यादेची गरज नाहीं.

**बोलण्याची भाषा.**—कोणत्याही विषयावर बोलावयाचें असलें तरी वक्त्याची भाषा सोपी असली पाहिजे. कारण श्रोत्यांमध्यें अशिक्षित लोकांचा भरणा फार असतो. ह्मणून जेथें बोलण्याचा प्रसंग असेल, तेथल्या श्रोत्यांची भाषा कितपत सोपी आहे, हें लक्षांत आणून आपलें बोलणें त्यांस सहज कळेल, अशा सुगम भाषेनें बोलण्याचा, वक्त्यानें होईल तितका यत्न करावा. ह्मणजे श्रोते न कंटाळतां स्वस्थ चित्तानें बसून त्या-

चें बोलणें ऐकतील, त्या योगानें उभयतांचेंही इष्ट कार्य नीट साधेल.

**स्थलावलोकन.**—जेथें आपलें भाषण व्हावयाचें असेल, तें स्थळ सवड असेल तर, वक्त्यानें अगोदर पाहून ठेवावें. त्या जाग्यांत कोणत्या स्थळीं आपण उभें राहून बोललों, तर सर्व श्रोते आपणास दिसतील, व आपण सर्व श्रोत्यांच्या दृष्टीस पडूं, आणि आपलें बोलणें त्यांस नीट ऐकूं जाईल, अशी जागा पारखून ठेवावी. व तशा ठिकाणींच बोलणाऱ्या वक्त्यास भाषण करतांना उभें राहण्याची सोय करावी. ह्मणजे श्रोते, आणि वक्ता, ह्यांचें सान्निध्य राहून, उभयपक्षांस सोईवार पडेल. बोलणाऱ्या वक्त्याचें भाषण चांगलें ऐकूं यावें, अशी सर्व श्रोत्यांची इच्छा असते; त्याप्रमाणें वक्त्याची मूर्ति बोलतेवेळेस दृष्टीस पडावी, अशीही त्यांस आवड असते. ह्मणून वर सांगितल्याप्रमाणें व्यवस्था होण्याजोगी असेल तितकी अवश्य करावी.

**भाषणाची वेळा.**—भाषण करण्याची वेळा वक्त्यास, आणि श्रोत्यांस, स्वस्थपणाची निर्वेध, व आल्हादकारक, अशी असली पाहिजे. कारण, इष्ट उद्योगास जाण्याचा तगादा असेल, त्या वेळीं, अगर सारा दिवस कामधंद्यानें थकून आलेल्या वेळीं, किंवा भरउन्हाच्या वेळीं, भाषणाची वेळ नेमल्यास, श्रोत्यांचीं मनें स्वस्थ असावयाचीं नाहींत. ह्मणून भाषणाची वेळा अशा प्रकारची सहसा ठरवूं नये. भाषण थोडा वेळ झालें तरी चिंता नाहीं. पण वक्त्याचें भाषण, श्रोते स्वस्थ चित्तानें सहजावृत्ति ऐकण्यास तयार असतील, असा भाषणाचा वेळ ठरवावा.

**वक्त्याचा पोषाक.**—वक्त्यांचा पोषाक साधा व स्वच्छ, असावा. कांहीं वक्ते भाषणास जातांना मुद्दाम उंची व भपकेदार, पोषाक करून जातात. पण अशा झाकीच्या डामडौलानें वक्ता नटून आला आहे, असा ग्रह श्रोत्यांच्या मनावर होतो. कांहीं वक्ते मलीन व दैन्यदर्शक अशा पोषाकानें भाषणास उभे राहतात. पण तोही घामट पोषाक, श्रोत्यांचीं मनें दूषित करतो. यास्तव, ह्या दोन्ही अप्रिय तऱ्हा सोडून द्याव्या. आणि, शिष्टसंप्रदायास शोभेल असा, प्रतिष्ठित रीतीचा साधा पण स्वच्छ, पोषाक करून वक्त्यानें भाषणास उभें राहावें. वक्त्याची मूर्ति पाहून, श्रोत्यांच्या मनावर पूज्य भाव उत्पन्न झाला पाहिजे. तो न होतां जर तिरस्कार उत्पन्न झाला, तर पुढील इष्ट कार्याची हानि होते. याकरितां आरंभापासून

प्रत्येक लहानमोठ्या गोष्टीविषयीं, वक्त्यानें सावधगिरी ठेविली पाहिजे.

**भाषणस्थळीं जाणें.**—भाषण होण्याच्या स्थळीं, श्रोतेमंडळ जमून अवश्य असेल ती सर्व व्यवस्था झाल्यावर, बोलण्याची सुरुवात करावी, अशी वक्त्यास सूचना झाली ह्मणजे, भाषणस्थळीं वक्त्यानें कसें जावें, हें चांगलें माहीत असलें पाहिजे. गैरमाहितीमुळें एखादेवेळीं अल्प दोष घडतात, पण त्यांचें प्रायश्चित्त फार मोठें भोगावें लागतें. वक्ता भाषणस्थळीं येऊन, भाषणाची सुरुवात करून, आपल्या वक्तृत्वगुणांची चांचणी दाखवी तोंपर्यंत, त्याजवर श्रोत्यांची फार सूक्ष्म दृष्टि असते. यामुळें अल्प स्वल्प गोष्टींनीं सुद्धां त्यांच्या मनावर बरा किंवा वाईट ग्रह होण्याची ती वेळ असते. भाषणस्थळीं बोलण्यास जातांना, कांहीं वक्ते घाबरल्यासारख्या स्थितीनें धांवत जातात. कित्येक धिमेपणाच्या डौलाकरितां, आळसानें ग्रस्त झाल्यासारखी वृत्ति दाखवून, फारच मंद गतीनें जातात. ह्या दोन्ही तऱ्हा श्रोत्यांस बऱ्या दिसत नाहींत. घाईनें जाणारा घाबरला असावा, किंवा धांदल्या असावा, असें त्यांस वाटतें; आणि हळू जाणारा मतिमंद, किंवा जड बुद्धि असावा, अशी ते कल्पना करितात. आरंभींच वक्त्याबद्दल श्रोत्यांच्या मनावर विपरीत ग्रह झाला, तर तो पुढें फार नडतो. याकरितां प्रथमदर्शनींच, आपणाविषयीं श्रोत्यांचीं मनें दूषित न होतील, अशी तजविज करणें फार अगत्याचें आहे. भाषणस्थळीं उभें राहण्यास जातांना, वक्त्यानें फार घाई करूं नये, व फार मंदपणाही धरूं नये. आपण घरांत सहजावृत्ति चालतों, तितक्या वेगानें, धिमेपणानें जाऊन, भाषणस्थळीं ताठ उभें राहावें. ह्मणजे श्रोत्यांच्या मनांत भलत्याच कुकल्पना येणार नाहींत.

**भाषणस्थळीं श्रोत्यांचें अवलोकन.**—वक्ता भाषणस्थळीं जाऊन उभा राहिला, ह्मणजे लागलीच भाषणाची सुरुवात करूं नये. तर, त्यानें शांतपणें चौफेर दृष्टि फिरवून, सर्व श्रोतेमंडळ नीट अवलोकन करावें. ह्या कामांत सरासरी एक मिन्युट वेळ (सावकाशीनें साठ अंक मोजण्याचा काल) खर्चावा. कारण, कोणताही मनुष्य, बहुसमाजापुढें विशेष कार्य करण्याच्या उद्देशानें जाऊन उभा राहिला, ह्मणजे त्याजवर एकदम सर्वांची दृष्टि लागते. यामुळें तो कितीही धीट असला तरी, थोडाबहुत घाबरून त्याचे डोळे दिपतात, व मन चंचल होतें. याकरितां, त्यानें एक वेळ सर्व समाजावर दृष्टि फिरवून पाहिल्यानें, त्याची नजर मरते; आणि चित्त स्थिर होतें.

म्हणून वक्त्यानें ह्या कृत्यांत एक मिन्युट घालवून बराच धीर आला, म्ह-
णजे मग भाषणास आरंभ करावा. ह्या स्थळीं भिन्या सभावाच्या, व न-
वीनच पुढें येणाऱ्या, उमेदवारांची फार त्रेधा उडते. ते सभेत भाषण-
स्थळीं जाऊन उभे राहिले म्हणजे, त्यांस सभाकंप प्राप्त होतो. मग काय
पुसता ! त्यांचे डोळे दिपतात, हातपाय लटपटूं लागतात, सर्वांगास दरद-
रून घाम येतो, छातींत धडकी भरते, कंठ दाटतो, जीभ कोरडी पडते,
चेहेरा फिक्का होतो, व बोलण्याचा प्रयत्न केला तरी तोंडावाटे शब्दच
निघेनासा होतो ! ! ! वक्त्यास दुर्दैवानें अशी स्थिति प्राप्त झाली म्हणजे,
लज्जित होऊन तोंड न उघडतां मुकाट्यानें खालीं बसणें भाग येतें. असला
भयंकर प्रसंग टळावा, म्हणून वरील सूचना दिली आहे. ती चांगली ल-
क्षांत ठेवून त्याप्रमाणें वागल्यास वक्त्यांचा सहसा हिरमोड होणार नाहीं.

**भाषणाचे विभाग.**—कोणतेंही भाषण असलें तरी, त्याचे मुख्य तीन
भाग असतात. पहिला उपक्रम, दुसरा विषयविवेचन, आणि तिसरा
उपसंहार. बोलतांना अशाच अनुक्रमानें बोलावें लागतें. आरंभीं उपक्रम
या भागावर बोलावें; नंतर ह्या भागाच्या शेवटास जोडून योजलेल्या वि-
षयाचें विवेचन करावें. आणि, त्याच्या शेवटास जोडून अखेरीस, उपसं-
हार या भागावर बोलून भाषणाची समाप्ति करावी. कोणत्याही वस्तूकडे
पाहिलें तर प्रत्येकीमध्यें विवक्षित घटना आढळते. योग्य घटनेवांचून
घांट चांगला दिसत नाहीं. घटनेची पद्धत पाहिली तर, तींत आदि,
मध्य, व अंत, अशी मांडणी दिसते. त्याप्रमाणें भाषणामध्यें घटना
असणें आवश्यक आहे. ज्या भाषणांत क्रमवार घटना साधली नसते, तें
अव्यवस्थित दिसतें. अनभ्यासी वक्ते बोलण्यास उभे राहिले, म्हणजे
भाषणांत घटनेचा नियम पाळण्याचें गैरसमजुतीनें ध्यानांत राहत नाहीं,
अनुक्रम चुकतो, त्यामुळें आरंभापासूनच ते विषयविवेचनावर बोलत सुट-
तात. कित्येक उमेदवार उपसंहाराच्या वेळीं जें बोलायचें तें, आरंभीं,
किंवा अधींमधीं, भलत्याच ठिकाणीं घुसडून देतात. अशा रीतीनें अनु-
क्रम सुटून भाषणें होऊं लागलीं म्हणजे, भाषणपद्धति बिघडून सगळी
एकच खिचडी बनते. त्यामुळें श्रोत्यांस त्याचा नीट उमज पडेनासा हो-
तो. भाषणाची अशी घाण होणें हें वाईट आहे. याकरितां वरील
क्रमाच्या पद्धतीनें भाषण करण्याची वक्त्यांनीं काळजी धरावी, म्हणजे

बोलणाऱ्या वक्त्यास व श्रोत्यांसही फार सुलभ पडेल. एकंदर भाषण किती वेळांत आटपावयाचें, हें सरासरी ठरवून ठेवावें. आणि त्या मानानें ह्या तिन्ही भागांस बोलण्याचा वेळ वांटून द्यावा. त्याचें सामान्य प्रमाण असें ठेवावें कीं, उपक्रम व उपसंहार, ह्या दोन्ही भागांमिळून $\frac{१}{४}$ वेळ द्यावा. आणि विषयाच्या विवेचनास $\frac{३}{४}$ वेळ द्यावा. एवढी वेळाची तफावत ठेवण्याचें कारण असें आहे कीं, भाषणांतील मुख्य अंग विषय विवेचन होय. त्याला वेळ कमी केला तर, मुख्य प्रतिपाद्य विषय अपूर्ण राहील तें प्रशस्त नाहीं. याकरितां वरील वेळाची वांटणी केलेली आहे. उपक्रम, आणि उपसंहार, हीं भाषणाचीं मुख्य अंगें नव्हेत. उपांगें होत. ह्मणून उपांगांचा प्रसंगानुरूप थोडा संक्षेप केला तरी, विलग दिसणार नाहीं; पण मुख्य अंगाची ह्मणजे, विषय विवेचनाची, काटकसर केली तर, एकंदर व्याख्यान अपूर्ण राहून वाईट दिसेल; ह्मणून अशी व्यवस्था केली आहे.

---

## वक्तृत्वकलेचीं अंतरांगें.

**विषयोपक्रम.**—पूर्वी सांगितल्याप्रमाणें, वक्तृत्वकलेचीं सर्व बाह्यांगें नीट ध्यानांत धरून, वक्ता भाषणस्थळीं येऊन उभा राहिला, ह्मणजे त्यानें प्रथम इष्टदेवतेचें स्मरण करून भाषणाचा उपक्रम वर्णावा. त्या वेळीं बोलण्याची सुरुवात (खर्गांत) खालच्या स्वरांत करावी. बोलतांना घाई करूं नये. स्वस्थपणानें शब्दोच्चार स्पष्ट करून, श्रोत्यांस ऐकूं जाईल इतक्या मोठ्या आवाजानें बोलावें. प्रथम श्रोत्यांस लक्षून प्रौढ शब्दांनीं त्यांचें थोडक्यांत अभिवंदन करावें. आपल्यांस बोलण्याचा प्रसंग दिल्याबद्दल आनंद प्रदर्शित करून आभार मानावे. नंतर आज भाषणास घेतलेल्या विषयाचें महत्त्व काय ? सांप्रत त्याचा प्रसंग काय ? त्याचा नीट विचार करून मनन करण्याची अवश्यकता किती आहे ? व याविषयीं जे विचार ग्रहण करण्यासारखे दिसतील, त्यांचा स्वीकार करून तदनुरूप वर्तन केल्यास, कोणती फलप्राप्ति होण्याचा संभव आहे ? हें संक्षेपानें $\frac{१}{८}$ वेळांत वर्णन करावे. ह्या उपक्रमाच्या भाषणानें, पुढील मुख्य विषयाचें निरूपण ऐकण्यास, श्रोत्यांचीं मनें उघडून तीं श्रवणास जागृत, व प्रफुल्लित, करावयाचीं आहेत. ह्या भागावरील बोलण्यानें, पुढील निरूपणाचा

भाग केव्हां सुरु होईल, अशी श्रोत्यांची मनोवृत्ति उत्कंठित करावयाची आहे. हें वक्त्यानें ध्यानांत ठेवून, तसा समय दिसतांच उपक्रमाचा भाग संपवावा. पण त्याचा, वेगळा तुकडा तुटला असें दाखवूं नये. उपक्रमाच्या समाप्तीचें शेवट, विवेचनाच्या भागास युक्तीनें जोडून, विषयाच्या विवेचनास आरंभ करावा. आरंभापासून शेवटपर्यंत, वक्त्यानें भाषणांत स्वतःचा संबंध आणूं नये. त्याचप्रमाणें थट्टामस्करी, व अलंकारिक भाषण, सहसा योजूं नये. योग्य प्रसंगीं विषयास साजेल अशा प्रकारें, खुबीदार बोलतां आलें तर शोभेल; परंतु तसें अलंकारिक भाषण न साधल्यास, वक्त्याकडे गौणत्व येतें, ह्मणून फार जपावें. एखाद्या गोष्टीचा निषेध करण्याचा प्रसंग असल्यास, सामान्य दुर्गुणाची, व दुराचाराची, निंदा करावी. पण व्यक्ति विशेषास, समाजास, किंवा एखाद्या जातीस, लक्षून कधींही बोलूं नये. तेणेंकरून वक्त्याचा भारदस्तपणा कमी होतो. आणि तशा भाषणाचा श्रोत्यांस तिरस्कार वाटूं लागतो. वक्त्याचें काम उपदेशकासारखें आहे, तरी सर्व श्रोते पूज्य आहेत. हें सर्वकाल मनांत वागवून, वक्त्यानें मर्यादशीलपणानें बोलावें; ह्मणजे श्रोत्यांच्या मनांत, वक्त्याविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन, त्यानें सांगितलेल्या गोष्टी ते स्वस्थपणानें ऐकतील, व त्यांतील भावार्थ भक्तीनें ग्रहण करण्याची त्यांस सहजीं इच्छा उत्पन्न होईल; ह्मणून, आपल्या भाषणांत प्रमाद न होण्याविषयीं वक्त्यानें निरंतर सावधागिरी ठेविली पाहिजे.

**विषयाचें विवेचन.**—विषयाचें विवेचन हें एकंदर भाषणाचें मुख्य सार आहे. इतका वेळ जें काय सांगितलें, तें सर्व ह्या विवेचन वर्णनाच्या सोयीकरितां होय असें समजावें. उत्तम बीजाची पेरणी करावयाची असली, ह्मणजे अगोदर जमीन चांगली नांगरून, व पाळ्या घालून, स्वच्छ करावी लागते; त्याप्रमाणें श्रोत्यांचीं मनें विषयश्रवणास योग्य अशीं तयार करावीं लागतात. एथवर सांगितलेल्या रीतीनें, चांगल्या खबरदारीनें वागून, श्रोत्यांची मानसभूमिका, उत्कृष्ट तयार केली असली तर, पुढील विषयविवेचनाचें कार्य करण्यास सोपें पडेल. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, उपक्रमाच्या शेवटाशीं, विषयवर्णनाचा भाग जोडल्यावर, बोलण्याचा स्वर जरा उंच धरावा. विषयविवेचनाचा भाग प्रतिपादन करण्यास, एकंदर भाषणाच्या वेळांपैकीं $\frac{3}{4}$ वेळ दिला आहे, हें लक्षांत ठेवावें. वर्ण-

नाच्या सोयीकारितां, विषयविवेचनाचे चार भाग करावे. त्यांतील पहिल्या, व दुसऱ्या भागास, एक एक चतुर्थांश वेळ द्यावा; आणि तिसऱ्या व चौथ्या भागास, प्रत्येकीं $\frac{1}{8}$ वेळ खर्चावा. ही वेळाची वांटणी चांगली ध्यानांत धरून त्या बेतानें भाषण करावें.

१ भाग पहिला.–ह्यामध्ये प्रकृत विषयाची वाटाघांट करण्याचें आज प्रयोजन काय आहे? ह्यावर $\frac{1}{4}$ वेळांत विवेचन करावें. ह्या भागांत प्रकृत विषयाकडे लोकांची मनोवृत्ति वळविण्यास, जीं मुख्य कारणें घडलीं असतील, तीं सांगावयाचीं आहेत. ताहान लागल्याखेरीज पाण्याची आठवण होत नाहीं. भूक लागल्यावांचून जेवण्याची इच्छा होत नाहीं. ह्मणजे कोणत्याही वस्तूची किंवा कृतीची जरूर लागते, तेव्हांच आपण तिचा शोध करतों, व ती मिळविण्याच्या प्रयत्नास लागतों. हा मनुष्यांचा साहाजिक धर्म आहे. भावी अगत्याचा, किंवा संकटाचा, प्रसंग अगोदर ओळखून, त्या वेळीं उपयोगीं पडण्यासाठीं, आपण आगाऊ तजवीज करीत नाहीं. यामुळें गरजेचा प्रसंग येऊन ठेपला ह्मणजे, फार धांदल उडते. आपल्या प्रपंचव्यवसायाकडे बारीक दृष्टीनें पाहिलें तर, सगळ्या कृत्यांत असली हेळसांड, किंवा गाफिलपणा, फार आढळतो. ह्मणून आपणास अडचणी फार येतात, व अत्यंत विपत्ति भोगावी लागते. पाहा, उन्हाळ्यांत उकाडा फार होतो, तेव्हां वस्त्रें नकोशीं होतात. ह्मणून ऊबदार वस्त्रांचा त्याग करून तीं आपण अव्यवस्थित टाकतों. त्यांस जपून ठेवण्याची तादृश्य काळजीनें व्यवस्था करीत नाहीं, यामुळें तीं मळतात, फाटतात, किंवा कसर लागून उंची उंची वस्त्रांची चाळण होते. तरी आपण त्याची पर्वा करीत नाहीं. आपल्या डोळ्यांवर चालत्या काळची धुंदी चढते, त्यामुळें पुढें सीतकाल येऊन त्यांत थंडीचे कडाके पडतील, तेव्हां गरम वस्त्रांची गरज लागेल. तीं नसलीं तर आपले फार हाल होतील. ह्याचें भानच राहत नाहीं. मनुष्य चालत्या कालांतच मग्न असतो. यामुळें पुढच्या कालावर दृष्टि देऊन, आपल्या भावी कल्याणाकरितां काय काय केलें पाहिजे, ह्या गोष्टीस तो विसरतो; ह्मणून त्याच्या हातून भावी संकट निवारणाचे उपाय होण्याजोगे असून, ते न करितां फक्त गरजेपुरते मात्र उद्योग करितो. पुढील अडचणीचे प्रसंग टाळण्याची आपण काळजीनें कांहीं तजवीज करीत नाहीं. अशा वे-

फिकिर वागण्यानें संकटसमय येऊन गुदरला ह्मणजे, तो टाळण्यास फार जड जातो. आपणा संसारी जनास ह्या आपल्या चुकीचा अनुभव नित्य येत असून, त्याबद्दलचें शासनही आपण भोगीत आहों! अशीं वहिवाटींतलीं उदाहरणें देऊन प्रस्तुत विषयाची वाटाघाट करणें, व तो सर्व श्रोत्यांच्या मनांत भरवून देणें, हें किती अगत्याचें आहे तें चांगलें सिद्ध करावें. उदाहरणें देणें तीं नित्य प्रचारांतल्या गोष्टींचीं द्यावीं. ह्मणजे तीं श्रोत्यांच्या मनांत लवकर भरतात. दाखला, किंवा उदाहरण, देणें झाल्यास त्याजवर फार बोलूं नये. आपली अमूर्त कल्पना, श्रोत्यांच्या लक्षांत येण्यास कठीण पडते, म्हणून मूर्तिमंत दाखल्यानें, आपली कल्पना त्यांच्या मनांत भरवून द्यावयाची. इतकाच त्याचा उपयोग आहे, ह्मणून उदाहरण दाखविण्याचें बोलणें संक्षेपानें बोलावें. त्याजवर फार पाल्हाळ केला तर विषयांतर होतें; आणि मुख्य विषय श्रोत्यांच्या मनांतून दूर जाऊं लागतो. याकरितां जें बोलणें तें विषयाला धरूनच बोलावें. विषयाला सोडून दूरच्या गोष्टींवर वक्ता भडकूं लागला, ह्मणजे भाषणाचा विरस होतो. ह्मणून वक्त्यानें फार जपावें. भाषणांतील मुख्य मुद्दे व्यक्त करण्याची फार खबरदारी घ्यावी. वक्त्यानें बोलतांना फार घाई करूं नये. व अति सावकाशही बोलूं नये. आपण घरांत, किंवा चार चौघांत, बसून एखाद्या विषयावर सहज बोलतों, तशा रीतीनें सोप्या शब्दांनीं बोलण्याचा पाठ ठेवावा. अडखळत, अडखळत, बोलूं नये. जें बोलणें तें अस्खलित, स्पष्ट, व प्रौढ, पण प्रचारांतील शब्दांनीं बोलावें. बोलतांना खालीं मान घालूं नये. किंवा एकाच पदार्थाकडे अगर एकाच बाजूकडे टक लावूं नये. आपल्या सभोंवतीं बसलेल्या सर्व श्रोत्यांकडे बघून बोलत असावें. वक्ता आमच्येशींच बोलत आहे, असें चौफेर बसलेल्या सर्व श्रोत्यांस वाटेल, अशा खुबीनें बोलण्याची वहिवाट ठेवावी. बोलतांना वारंवार खाकरूं नये, व भलत्याच ठिकाणीं थांबूं नये. पुस्तक वाचतांना विरामचिन्हाच्या ठिकाणीं, आपण जितका दम खातों, तितका योग्यस्थळीं विसावा घ्यावा. भाषणांत पुस्तक वाचण्याच्या धरतीनें, गाण्याच्या सुरानें, किंवा नाटकपात्राच्या भाषणपद्धतीनें बोलूं नये. उत्तम वक्ता, धिमेपणानें सहज सहज बोलतो, तशा पद्धतीनें वक्त्यानें बोलावें. आपला कंठ साफ राखण्याविषयीं, वक्त्यानें नेहमीं जपत जावें. कंठ हेंच वक्त्याचें

मुख्य हत्यार होय, ह्मणून तें नेहेमीं दुरुस्त राखलें पाहिजे. आंबट, तिखट, व तेलकट, पदार्थ फार खाऊं नये; कारण त्यांच्या सेवनानें कंठ बिघड-तो. सर्द हवा असली ह्मणजे, उघड्या अंगानें फार वेळ राहूं नये. त्या-वेळीं गळ्यास ऊबदार वस्त्रानें वेष्टण करावें. भाषणाच्या दिवशीं ज्येष्ठ-मधाची माळ, सुंठ, व खडीसाखर, तोंडांत धरून, त्यांचा रस हळू हळू पोटांत जाऊं द्यावा. जरूर वाटेल तर, भाषण करतेवेळेस कोणास समजूं न देतां हे पदार्थ तोंडांत धरावे; ह्मणजे खोकल्याची उबळ न होतां, तोंडास ओलावा राहील. भाषणाच्या पूर्वी आहार बेताचा करावा. ह्मणजे सुस्ति न येतां अंगांत चलाखी राहील. शूर शिपायास हत्यारावांचून शौर्य, व पराक्रम, दाखवितां येत नाहीं. त्याचप्रमाणें वक्त्यांस कंठाची अनुकूलता असल्यावांचून, आपल्या वाणीची, व तत्संबंधी अनेक गुणांची, करामत दा-खवितां यावयाची नाहीं. याकरितां बोलणाऱ्यांनीं आपला कंठ नेहेमीं चांगला राखण्यास काळजीनें जपत जावें.

**२ भाग दुसरा.**— या भागांत आपण घेतलेल्या विषयाच्या योगें, सार्वजनिक हिताहित काय होत आहे! हें थोडक्यांत कथन करावयाचें आहे. ह्या भागावर बोलतांना ह्या विषयाच्या योगें होणाऱ्या हिताचें, किंवा अनहिताचें वर्णन, प्रसंगानुरूप करणें असेल तें, अनेक प्रमाणें दाखवून, दुःख, किंवा आनंददायक, अशा हृदयद्रावक शब्दांनीं वर्णावें. ह्या भा-गावरील वर्णनानें पुढील दोन्ही भाग श्रवण करण्यास श्रोत्यांचीं मनें तयार करावयाचीं आहेत. कोणत्याही विषयावर बोलावयाचें असलें तरी, वक्त्या-ला त्याची पूर्ण माहिती असली पाहिजे. आपलें ह्मणणें सत्य आहे, तें मिथ्या वायफळ नाहीं, अशी ऐकणाऱ्यांची खात्री होत गेली पाहिजे. आपल्या बोलण्यास जागोजाग प्रमाणांचा बळकट पुरावा दाखविला, ह्मण-जे श्रोत्यांस भ्रांति वाटत नाहीं. प्रतिपादनाचा विषय वक्त्यास उत्कृष्ट अ-वगत असला पाहिजे. बोलणाऱ्याच्या मनांत विषय ओतप्रोत भरलेला अ-सल्याखेरीज, तो उत्तम रीतीनें प्रतिपादन करतां येत नाहीं. कारण, आपल्या मनांत शंभर कल्पना असल्या तर, बोलतांना त्यांतल्या दाहा तों-डांतून बाहेर पडतात. ह्मणूनच वक्त्याचें काम इतकें कठीण झालें आहे. हें बोलणाऱ्यांनीं निरंतर ध्यानांत धरावें. ह्मणजे त्याच्या सुधारणेकरितां आपण काय केलें पाहिजे हें लक्षांत येईल. बोलणाऱ्या वक्त्यांच्या अंगीं

धीटपणा, विनय, रसिकता, समयसूचकता, व विवेचनशक्ति, इत्यादि गुण, नेहमीं उभे असले पाहिजेत. त्याचप्रमाणें श्रोत्यांच्या मनोवृत्तींवर आलेली शिथिलता, भाषणानें घालवून त्यांचीं मनें वक्त्यांस टवटवीत करतां आलीं पाहिजेत. आपल्या वाणीच्या शब्दप्रयोगानें श्रोत्यांचें अज्ञान, आळस, व औदासिन्य, इत्यादि विकार नाहींसे करतां आले पाहिजेत. आणि त्यांच्या मनामध्यें, पुष्कळ माहितीचें ज्ञान, इभ्रत, व काम करण्याची आवड, जोरानें उभी करितां आली पाहिजे. खासगी संबंधानें परस्परांत वैर वाढून आपसांत दुई माजली असेल, ती नाहींशी करितां आली पाहिजे. खासगी द्वेष सार्वजनिक कामाच्या आड न आणितां, सर्वांच्या हिताचें काम सर्वांनीं एकमत होऊन, तें करण्यास मनापासून झटलें पाहिजे. श्रोत्यांची अशी मनोवृत्ति बनविण्याकरितां, वक्त्यानें अनेक उदाहरणें देऊन त्यांस तयार केलें पाहिजे. राजापासून रंकापर्यंत, सर्वांस एकमेकांची गरज लागते. साक्षात्, किंवा परंपरेनें, आपण एकमेकांच्या उपयोगीं पडल्यावांचून, कोणाचाही निर्वाह होत नाहीं. आपण श्रमानें, व शाहणपणानें, तयार केलेल्या वस्तु दुसऱ्यास देतों, व दुसऱ्यांनीं तयार केलेल्या आपण घेतों; अशी नित्य देवघेव चालली आहे. ह्मणून सर्वांच्या गरजा भागताहेत. सद्गुण संपादण्याचा, व सत्कर्में मनापासून आचरण्याचा, मनुष्यांनीं अभिमान धरावा. पण दुर्गुणयुक्त भलतींच कृत्यें करून, आढ्यता मिळविण्याचा गर्व धरूं नये. सार्वजनिक हिताचीं महत्कृत्यें उभारण्याचें, व सर्वांस पीडाकारक अडचणी असतील त्या दूर करण्याचें काम, फार जड असतें. ह्मणून तसलीं कामें करण्यास एखाद दुसऱ्या व्यक्तीचें बळ पुरत नाहीं. याकरितां त्या कामाचें महत्त्व सर्वांस समजून देऊन, तें करण्यांत आपलें किती हित आहे, हें दाखविलें पाहिजे. लोकांवर चांगल्या कामांची नीट प्रेरणा होऊन, त्यांच्या मनांत सर्व कल्पना नीट ठसल्या ह्मणजे, तीं करण्याविषयीं त्यांच्या मनांत इच्छा उत्पन्न होऊं लागते. तशा प्रसंगीं त्यांच्या मनोवृत्तींवर सुविचारांची वारंवार प्रेरणा केल्यास, ते विचार जोरानें वाढून इष्ट कामें करण्याकडे मनाची प्रवृत्ति होते. ज्यांत घालावें, त्या पात्रासारखी, पाण्याची आकृति बनते. मनुष्याच्या मनाची स्थिति जलासारखीच आहे. सुसंगति असली तर, तो मनुष्य सद्गुणी, व सदाचारी, निपजून, महत्कार्यें करण्यास योग्य होतो. आणि कुसंगति ला-

गली तर, तो दुराचरणी होऊन लोकांस पीडा देणारा बनतो. ह्या जगांतलें सुखदुःख, सर्व आपल्यावरच टेंकलेलें असतें. 'आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः' ह्मणजे आपण जसें आचरण करतों, तसें आपणास फळ प्राप्त होतें. आपण नाचण्या पेरल्या तर, त्यापासून गव्हांचें पीक यावयाचें नाहीं. आणि गहूं पेरले तर, नाचण्या न येतां, आपल्या हातीं गहूंच येतील, यांत संशय नाहीं. मित्रहो, आपणा सर्वांची उल्हास मुद्रा मला सांगते कीं, आपण आपसांतले कलह, व मतभेद, सर्व गुंडाळून ठेवूं. सार्वजनिक हित संपादनाच्या वेळीं, आह्मीं सगळे एक होऊं. आतां एकीची जूट करून, उपयुक्त ज्ञान संपादनार्थ, व धनोत्पादक उद्योग उभे करण्यास, मनोभावें सिद्ध होऊं. अशी मुद्रेच्याद्वारें आपण मला इच्छा दर्शविली, ती अत्यंत इष्ट होय. ती दिवसानुदिवस वाढवाल तर, आपणा सर्वांचें कल्याण होईल, यांत संशय नाहीं. अशा प्रकारें अनेक दाखले, व प्रमाणें, सांगून त्या विषयाचें हिताहित, श्रोत्यांच्या मनांत चांगलें भरवून द्यावें.

**३. भाग तिसरा.**—ह्या भागांत वर सांगितल्याप्रमाणें, एखाद्या गोष्टीनें नुकसान होत असल्यास तें बंद करण्याचे, अथवा एखादें लोकहिताचें काम सुरू करावयाचें असल्यास, तें उभारण्याचे उपाय कोणते, हें सांगावयाचें आहे. यास वेळ $\frac{१}{८}$ ठेवला आहे, हें ध्यानांत ठेवावें. उपाय सांगणें ते ग्रहण करण्यास शक्य, व सुलभ, असतील तेच सांगावे. ह्मणजे श्रोत्यांस जड वाटणार नाहीं. सोपे उपाय सांगितले ह्मणजे, श्रोत्यांस बाऊ वाटेनासा होतो. आणि वक्त्याच्या ह्मणण्याप्रमाणें, आचरण करण्याची त्यांस हौस वाटूं लागते. कठीण, व अशक्य, उपाय सांगितल्यानें, श्रोत्यांचीं मनें खिन्न होऊन पराङ्मुख होतात. ह्मणून उपाय सांगतांना, ते ग्रहण करण्याची त्यांस उत्कंठा होऊन, तशी कृति करण्याची ईर्षा उत्पन्न होईल, अशा प्रकारें बोधकारक, व उत्तेजनपर, शब्दांनीं बोलावें. लहान मुलांकडून एखादें काम करून घ्यावयाचें असलें, किंवा त्यांच्यांत विद्याभ्यास करण्याची ईर्षा उत्पन्न करावयाची असली, ह्मणजे त्यापासून पुढें कोणता लाभ होईल, हें आपण गोड गोड शब्दांनीं कथन करून, त्यांची इभ्रत वाढवितों. तोच प्रकार या ठिकाणीं केला पाहिजे. यापूर्वीं केलेल्या भाषणानें श्रोत्यांच्या मनाची खात्री झाली असेल तर, ही सूचना त्यांस रुचेल, व ग्रहण करण्यास कठीण वाटणार नाहीं. पण पूर्वीच्या

भाषणानें त्यांचीं मनें निभ्रांत न होतां, संशयात्मक राहिलीं असल्यास, या भागाच्या श्रवणानें, श्रोत्यांचीं मनें समाधान पावावयाचीं नाहींत. हें लक्षांत आणून, अगोदरपासूनच हा विषयविवेचनाचा भाग, संगतवार, व सप्रमाण, असा वर्णिला पाहिजे. वक्त्याचें भाषण श्रोत्यांस आवडलें, व त्यानें कथन केलेला विषय त्यांच्या मनांत उतरून चांगला ठसला असल्यास, श्रोते प्रसन्नवदन होतील. वक्त्याची भाषणशैली सुरेख, व विषयविवेचन मुद्देसूद पाहून वक्ता खऱ्या कळकळीनें बोलत आहे, अशी श्रोत्यांची पक्की खात्रीं झाली असल्यास, त्यांचे दील खुले होतील. तशी करामत करून यश मिळविणें, व आपल्या ह्मणण्याप्रमाणें वागण्यास श्रोत्यांचीं मनें तयार होतील, अशी वाक्‌चातुर्यानें अल्प कालांत मौज करून सोडणें, हें सर्व वक्त्यांच्या उत्कृष्ट भाषणावर अवलंबून आहे. पाणी चढत्या बाजूकडे न वळतां, उतरत्या बाजूकडे धांवत येतें, हें आपण नेहेमीं पाहतों. जनसमुदायाचीं मनें पाण्याच्या प्रवाहासारखीं आहेत. त्याला युक्तीनें, व शाहणपणानें, वळविणारा भेटला तर, पाहिजे त्या उपयुक्त कार्याकडे त्यांचा ओघ फिरवील. शहाणे शेतकरी, व माळी, नद्यांस बांध घालून पाणी अडवितात, आणि त्याचा संचय पुष्कळ होऊन पाणी वर आलें ह्मणजे, तें पाटाच्या वाटेनें आपल्या शेतांत नेऊन सोडतात. त्यायोगानें अनेक प्रकारचीं उंची पिकें होऊन त्यांचें कल्याण होतें. माळी लोकांच्या युक्तीचें तत्त्व ध्यानांत धरून, आमच्या वक्त्यांस जनसमुदायाचीं मनें एकवट करून इष्ट कार्याकडे वळवितां आलीं, तर केवढें कार्य करितां येणार आहे? तात्पर्य, असले भाग्यशाली वाक्‌चतुर पुरुष, आमचेकडे निपजतील तोच सुदिन समजला पाहिजे.

४. भाग चौथा.—यांत वरील उपायांप्रमाणें लोकांनीं वर्तन केल्यास लाभ कोणते व कसे होतील, हें थोडक्यांत वर्णन करावयाचें आहे. वक्त्याचें काम वैद्याच्या तऱ्हेसारखें दिसतें, तथापि त्यापेक्षां तें फार बिकट आहे. कारण, वैद्यास एका वेळीं एकाच व्यक्तीची तपासणी करून औषध योजना करावयाची असते. ह्मणून प्रत्येकास निरनिराळ्या औषधी देण्यास सांपडतात. तशी वक्त्यास सवड नसते. कारण हजारों लोकांस कोणतें संकट प्राप्त झालें आहे, त्या योगानें सर्वांची कशी, व किती, हानि होत आहे, ह्याचें अति अल्प कालांत, नाडि न पाहतां, केवळ

मुखचर्येवरून निदान ठरवावयाचें, व तें सर्व श्रोत्यांच्या कसोटीस बरोबर पटेल अशा रीतीनें, जेव्हांचे तेव्हां स्पष्टपणें कथन करून सांगावयाचें, हें किती कठिण आहे बरें ? तें झाल्यावर श्रोतृसमाजाची होणारी हानि टाळण्याचे उपाय योजावयाचे, तें किती अवघड आहे पहा. श्रोत्यांच्या, व त्यांच्यासारख्या इतरांच्या, हजारों किंवा लाखों व्यक्तींच्या प्रकृति, व त्यांचे आचारविचारादि एकत्र करून, त्या मिश्र समुदाय प्रकृतींस कोणतें औषध सोसेल, ग्राह्य होईल, व गुण देईल, हें उत्तम रीतीनें जाणून, श्रोत्यांच्या खात्रीस पटेल असें औषध योजलें पाहिजे. तितकेंही करून हटकून गुण येईलच, हा वैद्यांचे औषधासारखा भरंवसा धरवत नाहीं. कारण, एका व्यक्तीनें सतत औषध घेणें, व पथ्यपाण्यास जपणें, हें फारसें कठिण नाहीं. पण हजारों व्यक्तींस सांगितल्याप्रमाणें वागणें, हें त्यांच्यावर अवलंबून राहणार; तेव्हां अशा बहुलोकसमुच्चयाचें दुःख दूर करणें हें किती कठिण आहे, याचा वाचकांनींच विचार करावा. खुल्या मैदानांतील वाऱ्याची मोट बांधण्यासारखें, वक्त्याचें काम फार बिकट आहे. तें यथास्थित करतां येण्यास, वक्त्याच्या अंगीं अनेक गुणांची खाण असली पाहिजे. त्यावांचून तें कदापि चांगलें करितां यावयाचें नाहीं. असो. कोणतेंही स्थल, कोणताही काल, व कोणत्याही प्रकारचा जनसमुदाय, असला तरी, तीन गोष्टी चांगल्या ध्यानांत धरूनच वक्त्यानें नेहेमीं बोललें पाहिजे. ज्या देशांत आपण जन्मलों, त्या भूमातेविषयीं आपल्या मनांत अत्यंत पूज्यबुद्धि, व स्वदेशाचा खरा अभिमान, निरंतर जागृत असला पाहिजे. ज्या धर्मदीक्षेनें आपण चालतों, त्या स्वधर्मावर विश्वास असला पाहिजे. आणि ज्या न्यायार्जित कायदेशीर राजसत्तेखालीं आपण राहतों, ज्या कायद्याच्या योगें आपल्या जीविताचें व मालमत्तेचें रक्षण होतें, त्या सरकाराविषयीं राजनिष्ठा, ही सदोदित मनांत असली पाहिजे. हीं तीन मुख्य तत्त्वें सर्व वक्त्यांनीं निरंतर आपल्या मनांत धरून योग्य असेल तें बोलावें. उगीच फाजीलपणा करून बोलूं नये. कारण अन्य गोष्टींत वक्ता चुकला तरी तो गैर माहितगार, किंवा अज्ञानी आहे, असें मानून त्यास श्रोते क्षमा करतील. पण वरील तीन तत्त्वांपैकीं एखाद्याही गोष्टींत तो चुकला असतां, श्रोत्यांच्या क्षमेस पात्र होणार नाहीं. तेणेंकरून आपल्या अत्यंत श्रेष्ठ अशा वक्तृत्वपदास तो तत्काल मुकेल. हें सर्व

वक्त्यांनीं निरंतर ध्यानांत ठेवून बोलण्याची वहिवाट ठेवावी. आपल्यांत डाक्टर व वैद्य पुष्कळ आहेत. त्यांजकडे अनेक रोग्यांची नेहेमीं गर्दी जमते. त्यांस त्यांच्या औषधोपचारानें गुण येतो, हें आपण प्रत्यक्ष पाहतों. परंतु बहुसमुदायावर नानातऱ्हेचीं संकटें बहुत येतात, तीं ओळखून त्यांजवर हटकून गुण येण्यासारखे, योग्य उपाय सांगण्याजोगे, नांव घेण्यासारखे नामांकित चतुर वक्ते, आपल्यांत कोठें दिसत नाहींत. हें पाहून आश्चर्य वाटतें. एवढी मोठी न्यूनता राहण्याचें कारण हेंच कीं, वक्त्याचें काम फार नाजूक व बिकट आहे. तें चांगलें करतां येण्यास मनुष्याच्या अंगीं अनेक गुण असावे लागतात. तितके संपादन करण्याचें काम फार श्रमाचें, सामर्थ्याचें, व मोठ्या अक्कलेचें आहे. ह्मणून त्या उद्योगाचा कोणी फारसा पाठलाग करीत नाहींत. ह्मणूनच आमच्या देशांत चांगल्या वक्त्यांची फार उणीव राहिली आहे. ती दूर करण्याची सर्वांनीं मनापासून तजविज केल्यास, आपलेकडे चांगले वक्ते लवकर तयार होऊं लागतील. असा योग जमवून आणणें हें सर्व सुज्ञ लोकांवर अवलंबून आहे. ह्या भागावरील भाषण सर्व श्रोत्यांस आल्हाद वाटेल, व उमेद येईल, अशा आनंदयुक्त शब्दांनीं करावें.

**भाषणाचा उपसंहार.**—उपसंहार हा भाषणाचा शिरोभाग आहे. तो प्रत्येक भाषणास असलाच पाहिजे. विषय विवेचनाच्या शेवटास युक्तीनें जोडून, उपसंहाराचें भाषण उतरत्या स्वरानें प्रेमळ, व गोड शब्दांनीं, $\frac{1}{6}$ वेळांत करावयाचें आहें. हें ध्यानांत ठेवावें. उपसंहार न करितां भाषण आटपलें, तर तें धाब्याच्या घरासारखें भुंडें दिसतें. आपल्या शरीररचनेकडे पाहून विचार केला ह्मणजे भाषणाची ठेवण कशी असावी हें नीट ध्यानांत येईल.

उपसंहार हा भाषणाचा शिरोभाग होय. शिरोभागाचें ह्मणजे उपसंहाराचें भाषण थोडक्यांत पण सुरेख, रसभरित व सारयुक्त, असें झालें पाहिजे. सगळ्या शरीराचा दर्शनीय भाग चेहेरा, तो शिरोभागींच आहे. त्यांत नाक हें फारच श्रेष्ठ आहे. तें नकटें असलें, किंवा कांहीं कारणानें त्याचा शेंडा गेला, तर सगळे शरीराची फजीती होते. तस्मात् भाषणरूप शरीराचा उपसंहार हा शिरोभाग आहे. त्यांत अनेक ज्ञानेंद्रियांची करामत भाषणद्वारा दाखविली पाहिजे. ह्यांत वक्त्याच्या अक्कलेचा उत्कृष्ट

चेहेरा, भाषणरूपानें श्रोत्यांस स्पष्ट दिसेल अशी मौज केली पाहिजे. त्यांत कमतरता झाली तर, सगळ्या भाषणाचें नाक गेल्यासारखें होईल. मागल्या भागांत जो विषय श्रोत्यांच्या मनांत भरवून दिला, त्याजवर उपसंहाराच्या भाषणानें मुगुट घालावयाचा आहे. तो नीट घालतां आला तर, श्रोत्यांच्या मनांत भरविलेला उपयुक्त बोध कांहीं काळ तरी राहील. आणि उपसंहाराचा मुगुट चांगला न बसल्यास उघड्या डबींतला कापूर, जसा लवकर उडून जातो, तद्वत श्रोत्यांच्या मनांत भरविलेला विषय, लवकर उडून जाईल. हें ध्यानांत ठेवून वक्त्यांनीं ह्या भागावर बोलण्याची चांगली व्यवस्था करावी. ह्या भाषणाच्या अखेरीस, उपक्रमाच्या भाषणांतील मूल तत्त्वांचा थोडक्यांत संबंध जोडावा, आणि ह्याची त्याची गांठ घालून, एकंदर भाषणाची तोंडमिळवणी करावी. ह्मणजे सुरेख दिसेल. कीर्तनामध्यें अशा प्रकारें पूर्वरंग, व उत्तररंग, यांचा मेळ घालण्याचा सर्व कीर्तनकारांचा संप्रदाय आहे. तो वक्त्यांनीं ध्यानांत धरून, आपल्या भाषणांत त्यांचा चांगल्याप्रकारें उपयोग करावा. याप्रमाणें अखेरची तोंडमिळवणी झाल्यावर, आपलें भाषण स्वस्थ चित्तानें ऐकून घेतल्याबद्दल, सर्व श्रोत्यांचे विनयपूर्वक आभार मानून, भाषण समाप्त करावें. वक्त्याच्या भाषणानें श्रोत्यांवर पुढील श्लोकांत सांगितलेले परिणाम घडतील अशी वक्त्यांनीं मौज करून सोडावी.

### श्लोक.

तद्वक्ता सदसि ब्रवीतु वचनं यच्छृण्वतां चेतसः
प्रोल्लासं रसपूरणं श्रवणयोरक्ष्णोर्विकासश्रियम् ॥
क्षुन्निद्राभयदुःखकालगतिहृत्कार्यांतरप्रस्मृतिं-
प्रोत्कंठामनिशं श्रुतौ वितनुते शोकं विरामादपि ॥

---

## पुस्तकाचा उपसंहार.

उपोद्घात, आणि उपसंहार, हीं पुस्तकांचीं दोन अंगें होत. यांस अनुक्रमें पूर्वांग, व उत्तरांग, असेंही ह्मणण्याचा पाठ आहे. हीं दोन्हीं अंगें मुख्य विषयास फार उपयोगीं पडून, त्यास आरंभीं, व शेवटीं, मोठें साह्य करितात. मुख्य विषयाचें स्वरूप कोणतें, त्याचा हेतु काय, त्याचा उ-

पयोग कितपत आहे, व तो कोणत्या प्रसंगीं कसा करावा, इत्यादि मुख्य विषयांच्या गुणाचें कथन आरंभीं उपोद्घातांत असतें. त्याचप्रमाणें मुख्य विषयवर्णनानंतर, त्याच्या गुणाचें स्पष्टीकरण करून, त्याच्या योगें फलप्राप्ति काय होते, इत्यादि महात्म्याचें वर्णन शेवटीं उपसंहारांत येतें.

आरंभापासून शेवटपर्यंत, वक्त्यानें कोणकोणत्या गोष्टी ध्यानांत धराव्या, आणि योजलेल्या विषयावर कशा रीतीनें बोलावें, हें पृथक्पणें विस्तारानें वर सांगितलें आहे. तथापि बोलण्याचे प्रसंग सगळे सारखे नसतात. समयानुसार त्यामध्यें अनेक भिन्न प्रसंग प्राप्त होतात. त्या वेळीं कसें बोलावें, हें वक्त्यानेंच शाहणपणानें ठरविलें पाहिजे. ह्या पुस्तकांत वक्तृत्वकला संपादन करण्याची दिशा दाखविली आहे. त्या धोरणानें चालल्यास वक्त्याचें भाषण भलतीकडेच भडकणार नाहीं, असा अजमास आहे. तो कितपत साधला आहे, हें पाहणें सुज्ञ वाचणाऱ्यांकडे आहे.

कित्येक मनुष्यांमध्यें कांहीं गुण उपजतच ज्यास्त असतात, व कांहींकांत बरेच कमी असतात, असें आढळतें. कित्येकांचा कंठ स्वाभाविकच गोड असतो. कित्येकांचा वर्ण गोरा असून, मुद्रा फार सुरेख व मोहक असते. कित्येक चिताऱ्यांच्या व लेखकांच्या हातांत आकृति काढण्याचें, व अक्षर लिहिण्याचें कौशल्य, अंगभूतच ज्यास्त असतें. कित्येकांत कविता करण्याची शक्ति विलक्षण असते. कित्येक आपल्यापुढें आलेल्या विषयाचा खोल विचार करून, त्यांतील मर्म, झटकन शोधून काढण्यांत पटाईत असतात. त्याचप्रमाणें कांहीं व्यक्तींमध्यें वक्तृत्वगुण स्वभावतःच ज्यास्त असतो. आजवर जे वक्ते फार प्रसिद्धीस आले, त्यांच्याद्वारें वाक्चातुर्य गुण अपरमित दिसून आला, तो केवळ शिकून आला असेल असें ह्मणतां येणार नाहीं. त्यांच्यांत उपजतच तो गुण ज्यास्त असेल, ह्मणून त्यांचा एवढा मोठा प्रकाश पडला, असें ह्मटलें पाहिजे. तथापि, मनुष्यांत जे अंगभूत गुण असतात, ते अपूर्ण होत. त्यांस पूर्णता, व लोकोपयोगिता येण्यास, त्यांमध्यें अभ्यासाची भर घालावी लागते. ती चांगल्या रीतीनें पडली ह्मणजे, ते गुण अधिक वाढून फार चमकूं लागतात. मग त्यांची लोकांत फार प्रशंसा होते. यावरून ज्यांच्यांत आंगचे गुण ज्यास्त असतील त्यांणींही, अभ्यास केला पाहिजे. अभ्यासावांचून गुणांस उपयोगिता येत नाहीं. ‘गातां गळा, शिंपतां मळा, लिहितां हातवळा,’

इत्यादि जुन्या ह्मणी पडण्याचें तात्पर्य, अभ्यास करा, अभ्यास करा, अभ्यास करा, हेंच होय. तें वक्त्यांनीं ध्यानांत धरलें पाहिजे. आंगचे ज्यास्त गुण असणाऱ्या मनुष्यांस श्रम कमीं लागतील, व काल थोडा पुरेल, येवढेंच. पण गुणांची अपरमित वृद्धि होणें, त्यांत ठाकठिकी येऊन त्याचें स्वरूप अधिक चमकदार होणें, हें अभ्यासावांचून कदापि होत नाहीं. असा नियम आहे. असें जर नसतें, तर आज आपल्यांत मोठे बुद्धिमान असे अनेक शाहणे पुरुष प्रसिद्धीस आले आहेत, त्यांना वर्षांचीं वर्षें अभ्यास करावा लागला नसता. विद्यार्थ्यांस शिकविण्याकरितां विद्यालयें, व कालेजें, स्थापण्याची जरूरी पडली नसती. व शिकणाऱ्यांस साह्य करण्यासाठीं अनेक विषयांवर ढिगाच्याढीग पुस्तकेंही लिहिण्याची गरज पडली नसती. पण व्यवहारांत तसा प्रकार दिसत नाहीं. यावरून कोणत्याही विषयांत चांगली प्रवीणता येण्यास, मनुष्यांनीं अभ्यासच केला पाहिजे. पाहा, खाणींतून काढलेला हिरा स्वभावतः चकचकित दिसतो. परंतु तसल्या अपूर्ण स्थितीनें व्यवहारांत उपयोगी पडण्याची त्यामध्यें योग्यता नसते. त्याला उत्तम कारागिराच्या हातीं देऊन सहाणेवर घांसावा, व पैलु पाडावे, तेव्हां तो ज्यास्त चमकदार बनून, अधिक मौल्यवान होतो. आणि मग तो आंगठीवर, किंवा शिरपेंचांत, बसून थोर लोकांमध्यें उंच स्थानी विराजमान होण्यास पात्र होतो. तात्पर्य, उपजत अंगीं असणाऱ्या ज्यास्त गुणांच्या प्रौढीवर भरंवसा ठेवून, अभ्यासाकडे दुर्लक्ष्य केल्यास, बिन छेदाचीं मोत्यें जवाहिऱ्याच्या पेटींत जशीं कैद भोगीत राहतात, त्याप्रमाणें असले उपजत गुण कोणत्याच उपयोगाचे नसल्यामुळें, कोनाकोपऱ्यांत पडून व्यर्थ जातील. हें वक्त्यांनीं ध्यानांत आणून झटून चांगला अभ्यास करावा.

वक्त्यांनीं कोणत्याही विषयावर बोलतांना अनेक गोष्टी ध्यानांत ठेविल्या पाहिजेत. प्रतिपादनाचा विषय मंडणपर असो, किंवा खंडणपर असो, तो कथन करितांना आपणांस जी गोष्ट सिद्ध करावयाची असेल, तिचीं अनुकूल प्रमाणें देऊन, आपल्या ह्मणण्यास बळकटी आणण्याची तजवीज करणें, हें वक्त्याचें कर्तव्यच आहे. पण नुसती एकच बाजू दाखविली तर, न्यायबुद्धीच्या श्रोत्यांस वाईट वाटेल. वक्ता गैरमाहित आहे, किंवा तो वकीलीघाटाचें एकतर्फी बोलणें बोलून, श्रोत्यांच्या डो-

ळ्यांत धूळ टाकूं पाहतो, असाही कांहीं श्रोत्यांचा ग्रह होण्याचा संभव आहे. तो राहूं देणें चांगलें नाहीं. ह्मणून चतुर वक्त्यांनीं, तो आपल्या भाषणांतच नाहींसा करावा हें प्रशस्त आहे. कोणतीही वस्तु घेतली, किंवा कल्पना केली, तरी तिला एकच बाजू नसते. अनेक बाजू असतात. त्यांतली कोणती तरी एक बाजु आपणास सिद्ध करावयाची असते. तथापि, इतर बाजूंविषयीं वक्ता अज्ञानी किंवा अंध आहे, अशा आरोपास पात्र होऊं नये. याकरितां बोलतांना योग्य प्रसंगीं, आपल्या विरुद्ध पक्षाची आपणच बाजू घेऊन, त्यांच्या तर्फेनें शंका येण्यासारख्या असतील त्या पुढें घ्याव्या. आणि त्यांजवर समाधानाचीं उत्तरें असतील तीं देऊन, त्या शंका निर्जीव करून सोडाव्या. असें करतांना सगळ्या शंका खोडतां न आल्यामुळें कांहीं अबाधित राहिल्या, तर विरुद्ध पक्षाचीं प्रमाणें, व आपल्या पक्षाचीं प्रमाणें, न्यायाच्या कांट्यांत घालून तीं उघडपणें तोलावीं. ह्मणजे, अधिक वजन कोणत्या पक्षाकडे आहे, तें स्पष्ट दिसून येईल. असें केल्यानें वक्त्यामध्यें न्यायबुद्धि जागृत आहे, अशी श्रोत्यांची खात्री होऊन ते वक्त्यास अधिक पूज्य मानतील.

आपला भावार्थ श्रोत्यांच्या मनांत भरवून देण्याचें बहुतेक काम शब्दांनीं होतें. पण कांहीं प्रसंग असे असतात कीं, तो भावार्थ शब्दोच्चारांनीं बोलून दाखवितां येत नाहीं. कारण तसें करणें गौण दिसतें. तेव्हां प्रौढपणें हातांनीं खुणा करणें, अंगविक्षेप दाखविणें, मान हालविणें, व डोळ्यांनीं इशारा करणें, इत्यादि अनेक प्रकार करून, आपला भावार्थ श्रोत्यांच्या मनांत बिंबवून दिला पाहिजे. हें कृत्य फार कठिण आहे. तें कोणत्या प्रसंगीं किती करावें, हें शब्दांनीं सांगतां येण्याजोगें नाहीं. याकरितां, वक्त्यानें आपल्या अक्कलेनें ते प्रसंग जाणून, नीट दिसेल तितक्या मर्यादेनें ह्या कृति कराव्या. अंगविक्षेप हें वक्त्याच्या भाषणास उत्कृष्ट कोंदण होय. तें उत्तम रीतीनें करण्याचें साधल्यास मोठी मौज होते. हरदास लोक कीर्तनांत ह्या कृति फार चांगल्या करितात. तें वळण ध्यानांत ठेवून, तसें करण्याचा वक्त्यांनीं प्रयत्न केल्यास, हा गुण संपादन होईल.

भाषणामध्यें उपक्रम, विषयविवेचन, व उपसंहार, ह्यांवर किती वेळ बोलावें याबद्दल सामान्य मर्यादा सुचविली आहे. परंतु विषयानुरोधानें बो-

भण्याजोगी दिसेल तितकी कालमर्यादा कमजास्त करावी. एकाद्या विषयाचा उपक्रम अल्प करणें प्रशस्त दिसेल, कांहींचा बराच वाढवावा लागेल. त्याचप्रमाणें उपसंहारांतही, योग्य वाटेल तितका वेळ अधिक उणा करावा. कोणीकडून तरी एकंदर भाषणाची जुळणी कायम राखून, आपला मनोभाव, श्रोत्यांचीं मनें आनंदानें श्रवण व ग्रहण करतील, अशी भाषणपद्धति योजावी ह्मणजे झालें. सर्व वक्त्यांचीं भाषणें सांचांतून काढल्याप्रमाणें एकसारखी व्हावीं, असा बिलकुल हेतु नाहीं. मूर्ति, व प्रकृतिभेदाप्रमाणें, भाषणांत वैचित्र्य असावें हें इष्टच आहे. ज्याला जी वाट सोयीची दिसेल त्या वाटेनें खुशाल जावें. पण तसें करतांना वर सांगितलेले दोष होऊं न देतां, गुण संपादिले जावे हें मुख्य धोरण ध्यानांत ठेवावें ह्मणजे झालें. जे वक्ते अनेकवार सभेंत बोलून घटले असतील, त्यांस कांहींच नड पडावयाची नाहीं. पण जे नवीन उमेदवार असतील त्यांस, थोडासा तरी आधार व्हावा, ह्मणून ही अल्प सेवा केली आहे.

वक्त्याचें काम फार कठीण आहे. भिन्नरुचीच्या व भिन्नसमजुतींच्या अनेकविध मनुष्यांची, एकाच वेळीं खात्री करून व मनधरणी करून, आपल्या मनांतील भावार्थ, त्यांच्या हृत्पटावर उतरून देणें, हें काम फार बिकट आहे. वक्त्यांच्या कामाचें काठिण्य दाखविणें झाल्यास ‘ जावें त्याच्या वंशी तेंव्हा कळे ’ इतकेंच सांगतां येईल. असो. आपल्यांत कीर्तनपद्धति फार सुरेख आहे. बहुत दिवसांच्या अभ्यासानें कीर्तनरूप इमारत सप्रमाण, व सर्व सोयींनीं युक्त, अशी बनली आहे. कीर्तन, आणि वक्तृत्व, हे दोन्ही व्याख्यानाचेच प्रकार होत. कीर्तनांत पारमार्थिक गोष्टींचें विवेचन असतें—आणि वक्तृत्वांत ऐहिक गोष्टींवर निरूपण असतें. एवढाच कायतो फरक आहे. कीर्तनावर बहुत वर्षें अनेक विद्वान पुरुषांनीं परिश्रम केल्यामुळें, त्यांतले दोष नाहींसे होऊन, गुणांचा संग्रह फार झाला आहे. याकरितां कीर्तनांतील गुणांचा अंश, वक्तृत्वकलेंत घेण्याजोगा असेल तेवढा अवश्य घेतला पाहिजे. हरिदासांच्या कीर्तनांत, आरंभापासून शेवटपर्यंत, मुख्य विषयाचें अनुसंधान सुटत नाहीं. दाखल्याकरितां क्वचित् गोष्टी आल्या तरी, लागलीच ते मुख्य विषयाला मिळतात. एकंदर कीर्तनांत विषयांतर सहसा होत नाहीं. दाखले एकाच अर्थाचे असले तरी, ते निरनिराळ्या प्रकारांनीं योजलेले असतात. आपल्या अर्थाच्या स्पष्टीकरणार्थ, यो-

ग्य स्थळीं, मर्यादशीलपणानें, हावभाव उत्तम होतात. वर्णनाचा प्रसंग पाहून आवाज मंजूळ, कठोर, व प्रेमळ, करणें; मुद्रा दुःखभरित, व क्रोधयुक्त, अशी करून दाखविणें, हें काम चतुर हरिदास फारच वाखाणण्याजोगें करितात. ह्या सगळ्या कृतींची प्रसंगोपात्त वक्त्यांस गरज लागते. याकरितां, ज्या वक्त्यांस साधेल त्यांणीं, हे गुण साध्य करून घेण्याचा प्रयत्न करावा. कीर्तनांत प्रथमारंभींच्या उपक्रमाशीं, शेवटीं उपसंहारांत मेळ घालून, दोहींची तोंड मिळवणी झाल्यावर, मग कीर्तन समाप्त करण्याची पद्धत, अगदीं हिशेबी मेळाप्रमाणें ठरून गेली आहे. हा मेळ चुकला ह्मणजे, त्यास आपण बेताल ह्मणतों. आमच्या सर्व वक्त्यांनीं कीर्तनांतील अनेक पद्धति ग्रहण करण्याजोग्या आहेत. त्यांचें योग्य रीतीनें अनुकरण केल्यास, त्या वक्त्यांचीं व्याख्यानें ताळा मेळानें होतील अशी आशा आहे. ‘ बालादपि सुभाषितं ग्राह्यं ’ ह्या न्यायानें चांगला गुण सांपडेल तेथून घ्यावा, आणि त्याचा योग्य प्रसंगीं उपयोग करावा. हें शाहण्या लोकांचें कर्तव्य आहे. त्याप्रमाणें वागून, आमच्या वर्तमान व भावी बोलणाऱ्यांनीं, उत्कृष्ट वक्ते बनून स्वदेशसेवा मनापासून करावी, अशी त्यांस प्रार्थना आहे. वक्त्याचें कठिण काम शिकण्यास प्रवृत्त होणाऱ्या उमेदवारांस, पहिल्या पहिल्यानें फार जड वाटेल. अडचणी येतील, व लोकांकडून होणारा उपहासही सोसावा लागेल, हें खरें, परंतु चांगल्या गुणाच्या संपादनांत होणारा त्रास दूषणास्पद नाहीं. तो अत्यंत भूषणास्पद आहे. ‘ टांकीचे घाव सोसल्यावांचून देवकळा प्राप्त होत नाहीं.’. हें फार ध्यानांत ठेवावें. ‘ अभ्याससारिणीविद्या ’ हें वाक्य आमच्या तरुण मित्रांनीं ध्यानांत धरून, चांगला पाठलाग केल्यास, परमेश्वर कृपेनें त्यांस उत्कृष्ट सिद्धि प्राप्त होईल. असा मला भरंवसा आहे.

**श्रोत्यांस प्रार्थना.**—‘ सर्वे श्रोतारः सावधानाभवंतु ’ मंगलाचरणानंतर, हें वाक्य वदून मग पुराणकथेस आरंभ करण्याचा आमच्यांत संप्रदाय आहे. याचा अर्थ, सर्व श्रोत्यांनीं एकाग्र चित्तानें पुराणकथा श्रवण करण्यास सिद्ध व्हावें, असा आहे. कारण श्रोते सावधान चित्तानें श्रवण करीत असले, तरच वक्त्यांस आपलें काम यथामति करतां येतें. तसें न करतां श्रोतेच जर व्यवस्थित न वागतां, मध्यंतरी बोलूं लागले, किंवा गडबड करूं लागले, तर इष्ट कार्याची हानि होऊन, व्यर्थ कालक्षेप मात्र

होईल. 'क्षणशः कणशश्चैव विद्यामर्थं च साधयेत्' 'गेली घडी पुन्हा येत नाहीं.' इत्यादि आपल्या शहाण्या पूर्वजांचीं, उपदेशपर वाक्यें ध्यानांत धरून, योग्य रीतीनें वागलें पाहिजे. इतका वेळ वक्त्यांस योग्य सूचना देण्याचा लेख लिहिला. त्याप्रमाणें या पुढील लेखानें, श्रोत्यांची हात जोडून प्रार्थना करावयाची आहे. महाराज, वक्त्याचें काम फार कठीण आहे. ज्या वक्तृत्वकलेची इतका वेळ आराधना केली, ती कला आपलेकडे चालू व्यवहारी भाषेमध्यें प्रचारांत आलेली नाहीं. ह्मणून तिच्या अभ्यासाचीं पुस्तकें झालीं नाहींत. त्या कलेचें शिक्षण देण्याजोग्या शाळा, किंवा वर्ग, स्थापन झाले नाहींत. कित्ता घेण्याजोगीं वळणदार व्याख्यानें ऐकावयास मिळत नाहींत. वक्त्यांकडून भाषणांत जे दोष घडतात, त्यांच्या भाषणांत गुणांची अमक्या ठिकाणीं भर घालणें अवश्य असतें. तीं स्थलें ध्यानांत ठेवून वेळच्या वेळीं अमुक प्रकारानें दुरुस्ति करा, अशा तऱ्हेच्या श्रोत्यांकडून उपयुक्त सूचनाही मिळत नाहींत. यामुळें आमच्या तरुण वक्त्यांची स्थिति आंधळ्यासारखी बनली आहे! बिचाऱ्या अंध मनुष्यास हात धरून नेणारा, कोणी वाटाड्या मिळाला नाहीं, व चांचपण्यास साह्यकारक, अशी एखादी काठीही सांपडली नाहीं, ह्मणजे, त्या दृष्टिहीनाचे किती हाल होतील? हें मनांत आणा. तो बापडा दुर्दैवी अंध, साधनांवांचून अतिशय अडचणींत पडेल यांत संशय नाहीं. आमच्या प्रस्तुतकालच्या वक्त्यांची स्थिति अगदीं अशी आहे. आमचे हरिदास कीर्तनें करतात. पण त्यांना तयार झालेलीं आख्यानें मिळत असून, त्यांतलीं पद्यें तोंडपाठ करण्याची सवड असते. कथेकऱ्यांस उपयोगीं पडण्याजोगा आख्यानांचा व स्फुट पद्यांचा भरणा पुष्कळच आहे. अनेक प्रकारच्या कथानकांवर तुकाराम, रामदास, एकनाथ, मुक्तेश्वर, ज्ञानेश्वर, श्रीधर, वामनपंडित, मोरोपंत, व कबीर, इत्यादि थोर पुरुषांनीं फार मार्मिक, व रसभरित, असे अनेक कविताबद्ध ग्रंथ लिहिले आहेत. एवढें मोठें ज्ञानभांडाराचें डबोलें, आमच्या हरिदासांच्या हातीं आयतेंच लागल्यामुळें, त्यांस फार सोय झाली आहे. ह्मणून त्यांतलीं प्रसंगानुसार निरनिराळीं पद्यें, गायनाच्या तालसुरावर ह्मणून श्रोत्यांस रंजवितां येतें. शिवाय, हरिदासांच्या पाठीमागें, ताल सूर देणारे, व कविता वगैरे आठवून देणारे, साह्यकारी एक दोन तरी असतातच. एखादवेळ हरदासास कांहीं आठ-

वेनासें झालें, किंवा बोलून बोलून दम लागला, कीं, लागलीच साह्यकर्ते एखादा ख्याल, टप्पा, तराणा, किंवा ध्रुवपद, ह्मणण्याची सुरुवात करून, ताल मृदंगाच्या पकडा खेळूं लागतात. तेणेंकरून श्रोत्यांचीं मनें रंजन होतात. व मध्यंतरीं खंड पडल्यासारखा न दिसतां, कीर्तनकारांस विश्रांति सांपडते. आमच्या वक्त्यांची स्थिति हरिदासाहून फार वेगळी आहे. कारण त्यांचीं व्याख्यानें हरिदासांप्रमाणें ठरलेलीं नसतात. त्यांत पद्यांचा प्रायः उपयोग करतां येत नाहीं. सगळें भाषण व्यवहारांतील चालू भाषेंत करावें लागतें. श्रोते मंडळांत लहान थोर, आणि कमज्यास्त शिक्षण मिळालेले असेच फार असतात. त्या सर्वांस सहज समजेल, अशा सोप्या भाषेनें, पण खुबीदार बोलून, श्रोत्यांच्या मनाची खात्री करून देऊन, त्याप्रमाणें वागण्यास सिद्ध होण्यासाठीं त्यांचीं मनें वळवावयाचीं असतात. ही सगळी करामत एकट्या व्यक्तीस करावी लागते. शब्दयोजनेंत, किंवा विचारसरणींत, किंचित् चूक झाली तरी, ती छपली न जातां लागलीच उघडी पडते. तात्पर्य, भाषणस्थानीं उभें राहून बहुसमाजापुढें उपयुक्त विषयावर व्याख्यान देणें हें काम फार कठिण आहे. याकरितां आमच्या तरुण, व होतकरु वक्त्यांस, सर्वप्रकारें फार सांभाळून घेतलें पाहिजे. गैरमाहितीमुळें, व नवखेपणामुळें, वक्त्यांकडून पुष्कळ चुका होण्याचा संभव आहे. हें मनांत वागवून, सर्व श्रोत्यांनीं सुज्ञपणानें वक्त्यांवर कृपादृष्टीच ठेविली पाहिजे. त्यांजकडून बोलण्यास किंचित् विलंब झाला, किंवा बोलतांना शब्दांची, वाक्यरचनेची, उच्चाराची, अगर विवेचनसंबंधाची, कांहीं चूक झाली तरी, ती पोटांत घातलीच पाहिजे. लहान मुलें प्रथम बोलूं लागलीं ह्मणजे त्यांजकडून क्षणोक्षणीं अनेक चुक्या होतात, तरी आपण त्यांचा दोष न मानितां कौतुकच करितों. त्यांचा तिरस्कार करून उपहास कधींच करीत नाहीं. आज आमच्या वक्तृत्वाची बाल्यदशा आहे. ह्मणून सर्व श्रोत्यांनीं, आमच्या वक्त्यांवर मातृवात्सल्याचें प्रेम ठेवून संभाळलें पाहिजे. त्याखेरीज वक्त्यांमध्यें धैर्य वाढणार नाहीं. एखाद्या गांवांत, आठवड्याचा नवीन बाजार सुरू करणें झाला ह्मणजे, त्या गांवचे लोक, माल घेऊन येणाऱ्या लोकांस, पुष्कळ साह्य करितात. कोणी आपल्या ओट्यांवर, दुकान मांडण्यास फुकट जागा देतो. कोणी त्यांच्या वाहक जनावरांस फुकट वैरण देतो.

त्यांचा माल खपविण्याकरितां, कांहीं लोक जरूर नसतांही मुद्दाम त्यांचा माल विकत घेतात. कांहीं व्यापाऱ्यांचा माल, चोख नसून नरमगरम असला तरी, किंमतीची वगैरे घासाघीस न करितां, तो माल घेऊन पुरा दाम त्यांस देतात. अशाप्रकारें उदम्यांस साह्य होऊं लागलें, ह्मणजे ते नफ्याच्या लालचीनें दर आठवड्यास त्या गांवीं येऊन, तेथल्या लोकांस लागणारा सर्व माल घरीं आणून पोंचवितात. आमच्या तरुण व नवख्या उमेदवारांची गोष्ट अशीच आहे.. त्यांजकडून होणारे दोष आज पोटांतच घातले पाहिजेत. श्रोते मंडळी वक्त्यांस संभाळून घेते, असें आपण दाखविलें ह्मणजे, तरुण वक्ते भीति सोडून भाषणास उभे राहतील, असा क्रम कांहीं दिवस चालला तर, तेच वक्ते चांगले तयार होऊन त्यांत कांहीं ग्ल्याड्स्टनही निपजतील. तितकें आपलें भाग्य उदयास आलें तर, देशाचा केवढा फायदा होईल? हें वाचणाऱ्यांनींच पाहावें. तात्पर्य, असली सोन्यासारखी वेळ बनवून आणणें; हें आमच्या सर्व श्रोतेमंडळावर अवलंबून आहे. त्याप्रमाणें वागण्याची, दयाळू देवानें त्यांस कृपा करून बुद्धि द्यावी. अशी त्या सर्वेश्वराची प्रार्थना करून हा लेख संपवितों.

---

# नमुन्याचीं भाषणें.

## चंद्रापीड राजपुत्रास शुकनास प्रधानाचा बोध.

**प्रसंग.**—वेत्रवती नदीच्या तीरीं, विदिशा नांवाच्या नगरींत तारापीड नामें राजा राज्य करीत होता. त्याचा पुत्र चंद्रापीड ह्याचा विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर, त्याला यौवराज्याचा अधिकार देण्याचा समय प्राप्त झाला. त्या वेळीं राजाचा प्रधान शुकनास, याणें राजपुत्रास बोध केला. त्या उपदेशपर भाषणाचा सारांश:—

बाबा चंद्रापीडा, तुझा विद्याभ्यास पूर्ण होऊन, तूं आतां सर्वविद्यासंपन्न झाला आहेस. यामुळें स्वकर्तव्याच्या सर्व गोष्टी तुला अवगत झाल्या आहेत. ह्मणून, आतां कोणतीही गोष्ट तुला सांगण्याचें कारण राहिलें नाहीं. तथापि, तारुण्याचा अल्लडपणा, लक्ष्मीचा मद, विषयसुखाचा

मोह, आणि राजसुखांत नेहेमीं गर्क असल्यामुळें डोळ्यांवर आलेली धुंदी, ह्या चार गोष्टी फार कठिण आहेत. ह्मणून तुला थोडा उपदेश करणें इष्ट वाटल्यावरून, मी आतां जें सांगतों, तें नीट ध्यानांत धरून वागलास, तर तुझें सर्वप्रकारें कल्याण होईल.

गर्भश्रीमंती, तारुण्य, सौंदर्य, व मोठा पराक्रम, हीं सर्व तुला अनुकूल आहेत. पण, ह्या चारी गोष्टी मोठ्या अनर्थकारक होत. यांतली एक एक गोष्ट देखील, मोठाले अनर्थ उत्पन्न करणारी आहे. मग ह्या चारी गोष्टी अनुकूल असणाऱ्या पुरुषांस, केवढी बरें भीति आहे ? शास्त्राभ्यासोदकानें जरी बुद्धि स्वच्छ झाली असली, तरी ती तारुण्यांत मलिन होते. वृक्षाचीं सुकलेलीं पानें, वारा भराभर उडवून नेतो. त्याप्रमाणें, तरुण पुरुषाचा वयोधर्मस्वभाव, त्यास भलतीकडेसच ओढून नेतो. विषयवासनारूप मृगजलाच्या योगानें, इंद्रियरूप हरिण, अनिवार भडकतात. तारुण्याच्या भरांत मन रंगलें असल्यामुळें, जों जों विषयसुखें भोगावीं, तों तों मनास तीं अधिकाधिक गोड वाटूं लागतात. मग रानांत वाट चुकलेल्या मनुष्यास, दिशा देखील कळेनाशी होऊन, तो भलत्याच मार्गास लागतो, त्याप्रमाणें, विषयासक्त झालेला मनुष्य, कुमार्गाकडे धावूं लागतो.

तुझ्यासारखे पुरुष उपदेशास योग्य होत. कारण, स्फटिकावर चंद्राचे किरण पूर्णपणें प्रकाशित होतात. त्याप्रमाणें ज्याचें मन विद्याभ्यासानें शुद्ध झालें असतें, त्यास उपदेश चांगला ठसतो. गुरुवचन चांगलें असलें तरी वाईट मनुष्याच्या कानास तें कडू लागतें. तथापि चांगल्या पुरुषांना त्यापासून फार आनंद होतो. त्याप्रमाणें, गुरूपदेशानें मनुष्याच्या मनांतील अज्ञानरूप अंधकार एकदम नष्ट होतो. तुला विषयसुखाची गोडी अद्याप लागली नाहीं. ह्मणून हा काल तुला उपदेश करण्यास योग्य आहे. मदनबाणानें एकदां हृदयास छिद्रें पाडलीं, ह्मणजे उपदेशरूप जल त्यांतून गळून जातें. मनुष्य कुलीन, व विद्यासंपन्न असला, तरी तारुण्याच्या योगानें त्याचा स्वभाव बदलतो. मग त्याच्या अंगीं सभ्यपणा येत नाहीं. चंदनकाष्ठाचा अग्नी असला, तरी तो भाजणार नाहीं काय ? वडवानल समुद्रांत आहे, तरी तो जाळीत नाहीं काय ? गुरूपदेश हें, पुरुषाच्या मनांतले सर्व मल धुऊन टाकण्यास योग्य, असें स्नानच आहे. त्याचें माहात्म्य काय सांगावें ? पिकलेल्या केंसांची कुरूपता न आ-

णितां तो उपदेश, तरुण मनुष्यास पोक्तपणा देतो. विशेषेंकरून राजाला, उपदेशाची फार अवश्यकता आहे. कारण, त्यास बहुधा कोणी उपदेश करीत नाहीं. त्याच्या सभोंवती असणारे लोक, महाराजांच्या ह्मणण्यास होस हो, देणारेच असतात. राजा नेहेमीं गर्वानें फुगलेला असतो. ह्मणून, कोणी केलेला उपदेश त्याला ऐकूं जात नाहीं. आणि कदाचित् ऐकूं गेला, तरी त्याचा स्वीकार न होतां धिक्कारच होतो.

लक्ष्मी प्राप्त झाली, तरी तिला संभाळण्याची भीति फार असते. ती अतिचंचल असल्यागुळें, पाहातां पाहातां नाहींशी होते. ह्मणून, तिच्यावर भरंवसा ठेवतां येत नाहीं. लक्ष्मी जाऊं लागली, ह्मणजे कुलीनपणा, सौंदर्य, चातुर्य, सुस्वभाव, विद्या, धर्म, औदार्य, सदाचार, व सत्य, इत्यादि गुण अंगीं असतांही, ती त्यांची पर्वा न धरितां, तशा गुणसंपन्न पुरुषांचाही त्याग करून जाते. दिव्याची ज्योत जों जों, मोठी करावी, तों तों, ती अधिकाधिक काजळच बाहेर टाकते. त्याप्रमाणें, लक्ष्मी जसजशी वृद्धिंगत होते, त्याप्रमाणानें, तिच्या योगें दुष्कर्मेंच अधिकाधिक वाढूं लागतात. लक्ष्मीच्या योगें फसला नाहीं, असा पुरुष विरळा! मनुष्यांस संपत्ति प्राप्त झाली, ह्मणजे परस्त्रीगमन हें, त्याला भूषणच वाटूं लागतें. मद्यपान करणें ही मौज वाटते. स्वस्त्रीचा त्याग करणें, ह्यांत कांहीं वाईट आहे असें वाटेनासें होतें. वडील माणसांचा अपमान करण्यांत त्यांस मोठेपणा वाटूं लागतो. गाणें, बजावणें, नाच, रंग, इत्यादि गमती करणें, ह्यांतच रसिकता वाटूं लागते. उद्दामपणाच्या वागण्यांतच मोठें सामर्थ्य आहे, असें वाटूं लागतें. यथेच्छ वर्तन करणें हीच मोठी स्वतंत्रता आहे, असें भासूं लागतें. देवाधर्माची निंदा करणें, ह्यांतच मोठी विद्वत्ता आहे, असा भ्रम होऊं लागतो. जवळच्या तोंडपुज्या लोकांनीं स्तुति केली, ह्मणजे तीच सुकीर्ति आहे असें वाटूं लागतें. लबाड लोकांनीं वाहवा केली ह्मणजे, त्याल्या गुणांनीं संपन्न असे आपण अवतारी पुरुषच आहों, असें वाटून भलतींच कृत्यें करून लोकांच्या थट्टेस पात्र होतो. ह्यांच्या मूर्खपणाची लोकांनीं थट्टा केली, तरी त्यांस ती कळेनाशी होते. लोकांनीं त्याला देव ह्मटलें, ह्मणजे आपल्यास चार हात, आणि तीन डोळे, आहेत कीं काय, असें वाटूं लागतें. आपण कोणाकडे बघितलें, ह्मणजे त्याजवर मोठी कृपा केली, असें वाटूं लागतें. कोणाजवळ भाषण केलें, ह्मणजे मोठी देणगी दिल्यासारखें

वाटतें. कोणाला आज्ञा केली ह्मणजे त्याला वरप्रदान दिल्यासारखें वाटतें. कोणाला स्पर्श केला, ह्मणजे त्याला पवित्र केल्यासारखें वाटतें. आपल्याच मोठेपणाच्या गर्वानें तो फुगला, ह्मणजे तो देवांना नमस्कार करीत नाहीं. ब्राह्मणांचा आदर करणें, थोरांचा सत्कार करणें, वडिलांचा मान ठेवणें, व गुरूला उत्थापन देणें, ह्या गोष्टी तो टाकून देतो. विद्याभ्यासार्थ श्रम करून, विषयोपभोगास मात्र अंतरले, अशी तो विद्वान लोकांची थट्टा करितो. वडिलांचा उपदेश, ह्मणजे ह्मातारपणाची बडबड, असें त्यास वाटतें. प्रधानाचा उपदेश ऐकणें, ह्मणजे आपलेकडे कमीपणा येतो, असें वाटूं लागतें. हितोपदेश करतो, त्याजवर रागावणें, हांजी हांजी करून हात जोडून देवासारखी स्तुति करितो, त्याजवर प्रसन्न होणें, त्याजवळ बोलणें, त्याला जवळ ठेवणें, त्याला श्रीमंत करणें, व तो सांगेल तें ऐकणें, हेंच त्यास चांगलें वाटूं लागतें.

हें राज्य, व हें तारुण्य, हजारों अनर्थांनीं युक्त आहे. याकरितां, हे राजपुत्रा, लोक निंदा करणार नाहींत, थोर उपहास करणार नाहींत, मित्रांस वाईट वाटणार नाहीं, अशा प्रकारें तूं आचरण कर. लबाड, तोंडपुजे लोक, व मोहक स्त्रीया, तुला फसविणार नाहींत, अशा प्रकारचें तूं वर्तन ठेव. खरोखर तूं स्वभावतःच शहाणा आहेस. त्यांत तुझ्या पित्यानें बहुप्रयत्नानें तुला सुशिक्षण दिल्यामुळें, त्यांत मोठीच भर पडली आहे. चंचल बुद्धीच्या माणसास अशानेंही गर्व होतो, ही गोष्ट खरी आहे. पण तूं तसा नाहींस. तुझे सद्गुण पाहून तुझ्याशीं मला बोलावेंसेंच वाटतें. ह्मणून मी पुनः पुनः एवढेंच सांगतों कीं, मनुष्य शहाणा, विद्वान, पराक्रमी, कुलीन, व उद्योगी, असला तरी, लक्ष्मी त्यास मलिन करिते, याकरितां तूं सद्गुणयुक्त वर्तन करून, वंशपरंपरागत चालत आलेल्या चालीप्रमाणें, तुझ्या पित्यानें तुला दिलेला यौवराज्याचा अधिकार चालवून, शत्रूंचा उच्छेद कर. आप्तवर्गाचें कल्याण कर. प्रजेचें पुत्रवत् पालन कर. शाहणे, पोक्त, खरे अभीष्टचिंतक, व अनुभवी, असे पिढीजादे मंत्री, व इतर मुत्सदी, असतील ते संग्रहास ठेव. कोणाचा अपमान करूं नको. भूतदया सोडूं नको. क्षमा, व शांति, ह्यांस विसरूं नको. प्रजेची उन्नति व कल्याण होण्याचे मार्ग शोधून ते चालू कर. परस्त्रिया मातेप्रमाणें मान. स्वस्त्रीवर प्रीति ठेव. आपल्या राज्यांतील सर्व कामगारांवर,

व त्यांच्या कामकाजावर, जातीनें चांगली देखरेख ठेवीत जा. दुसऱ्यांचीं राज्यें घेण्याची हाव धरून उगीच लढाया उभारूं नको. कारण, त्यांच्या पायीं अतोनात द्रव्याचा नाश होतो. हजारों माणसें, लढाईमुळें प्राणास मुकून, रक्ताच्या नद्या वाहतात. मृतमनुष्यांचीं लक्षावधि बायकापोरें, उघडीं, व निराश्रित पडून दीन होतात. यामुळें तीं लढाईच्या उत्पादकांस, नानाप्रकारच्या शिव्या देऊन शापही देतात. !!! ह्मणून कारणावांचून लढाई उपस्थित करूं नको. कोणावर जुलूमजबरदस्ती करूं नको. द्रव्याचा, व इतर सामानाचा, संग्रह व हिशेब, चोख ठेवण्याची खबरदारी ठेवीत जा. सर्व कामांत न्यायाचें वर्तन ठेव. वेळाचा अपव्यय करूं नको. स्वधर्माचरणास विसरूं नको. यथान्याय कर बसवून, अवश्य असेल तितक्याच बेताचा प्रजेपासून पैका घेत जा. पण धौताल खर्चाच्या भरतीसाठीं, अनेक प्रकारच्या करांनीं प्रजेस पिळून, तिचें द्रव्य हरण करण्याची वासना धरूं नको. आपल्या दौलतीचा, व खासगीचा, खर्च काटकसरीनें करून, जमेपेक्षां खर्चाची रकम बरीच कमी राहील, याविषयीं फार जपत जा. ह्मणजे तुझ्या द्रव्यभांडारांत, दरसाल बरीच रकम शिलकेस ठेवतां येईल. मग, तुला द्रव्याची अडचण कधींच पडणार नाहीं.

विद्येचा व्यासंग ठेवीत जा. वडिलांचा मान राखीत जा. परमेश्वराचें, व पापाचें भय धरीत जा. परोपकाराचीं पुण्य कर्में करीत जा. एकंदरीनें, तुझें आचरण पाहून सर्वांचीं मनें समाधान पावतील; अशी नेहेमीं राज्य करण्याची शिस्त ठेव. ह्मणजे परमेश्वर तुझें सदासर्वकाल कल्याण करील.

---

## २. धर्माच्या सभेंत सात्यकीनें केलेलें भाषण.

**प्रसंग.**—पांडवांनीं बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगून ते प्रसिद्ध झाल्यावर, विराटराजाची कन्या उत्तरा, ही अभिमन्यूस देऊन लग्नविधि आटोपला. त्या वेळीं विराटनगरी समीप ‘ उपलव्य ’ गांवीं पांडव राहत होते. तेव्हां तेथें, आपल्या राज्याचा विभाग, कौरवांपासून घेण्याची काय तजवीज करावी, ह्या विचारासाठीं, बळिराम, श्रीकृष्ण, विराट, द्रुपद, सात्यकी, व त्यांखेरीज इतर नामांकित राजेही, बोलाविल्यावरून जमले होते. त्या वेळीं, प्रथम श्रीकृष्णांनीं उपक्रम केला कीं, पूर्वीं ठरल्याप्रमाणें, पांडवांनीं आपली प्रतिज्ञा शेवटास नेली. यास्तव आतां

त्यांस आपल्या हक्काचा वांटा, कौरवांकडून मिळणें यथान्याय आहे; तर तो कौरवांजवळ कशा रीतीनें मागावा, ह्याबद्दल सर्वांनीं आपआपले अभिप्राय स्पष्ट कळवावे. असें सुचविल्यावर, बलिरामांनीं भाषण केलें; त्यांत कौरवांशीं भांडूं नये, त्यांच्याशीं युक्तीनें गोड गोड बोलून, जें मिळेल तें घेऊन वाद आपसांत मिटवावा, असा आशय दर्शविला. त्याचा, अर्जुनाचा शिष्य जो महाशूर सात्यकीयादव ह्यास फार राग येऊन, त्यानें मोठ्या आवेशानें भाषण केलें, त्याचा सारांशः—

महाराज, मनुष्याचें जसें मन असतें, तसें तो बोलतो. त्याचें मन बोलण्यावरून सहज कळतें. शूर व भ्याड, दोन्हीप्रकारचे पुरुष, जगांत आहेत, ह्मणून ज्याच्या त्याच्या स्वभावाप्रमाणें कोणताहि एक पक्ष त्यास आवडतो. एकाच वृक्षाच्या एका खांदीवर फळें येतात व दुसरीवर येत नाहींत. तसेंच एकाच कुळांत एक पुरुष शूर होतो, आणि दुसरा भित्रा निपजतो. हलधरदादा आतां जें बोलले, त्याचें मला आश्चर्य वाटत नाहीं. पण त्यांचें बोलणें ऐकून, घेणाऱ्यांचें मला वाईट वाटतें. धर्मराजास अल्पस्वल्प दोष देणाऱ्या माणसांस सभेंत निःशंकपणें बोलण्याची परवानगी मिळते, ह्याचें मला आश्चर्य वाटतें. धर्मराजास खेळतां येत नाहीं, हें ठाऊक असतां, त्याला मुद्दाम आपल्या घरीं खेळावयास बोलावणें, व हवें तसें लबाडीनें खेळून त्यास जिंकणें, ह्यांत अन्याय नाहीं, असें कोण ह्मणेल? धर्मराजाच्या घरीं जाऊन, भावांबरोबर, किंवा त्याच्याबरोबर, खेळून त्यांस जिंकते, तर ती गोष्ट वेगळी होती. पण तसें न करितां मुद्दाम आपले घरीं बोलावून, कपटानें त्यांस जिंकलें, ह्यास चांगलें कोण ह्मणेल? पण तें राहूं द्या; द्यूतांत जो हरेल त्यानें वनवास व अज्ञातवास भोगावा, असा बिकट 'पण' लाविला होता. त्याप्रमाणें वनवास, व अज्ञातवास, मिळून आजपावेतों तेरा वर्षें, मोठे कष्ट व महत्संकटें, भोगून पांडवांनीं आपली प्रतिज्ञा पुरी केली. तेव्हां आतां त्यांस न्यायानें वडिलोपार्जित राज्य मिळणें हें योग्य आहे. असें असून, दुर्योधनाजवळ धर्मराजानेंच नम्रतेनें बोलावें, असें दादा ह्मणतात, तें किती गैर आहे? अन्यायानें राज्य मिळविण्याची धर्मराजा इच्छा करीत नाहीं, तर त्याच्या हक्काचें आहे तें त्यास मिळालेंच पाहिजे. पांडवांनीं अज्ञातवास पुरा केला नाहीं, अशी कितीएकांस शंका होती, पण तिचें भीष्म,

द्रोण, व विदुर, ह्यांनीं निराकारण केलें आहे. याकरितां आतां पांडवांचें वडिलोपार्जित राज्य आहे, तें जर कौरव त्यांस सोयीनें देणार नाहींत, तर त्यांस मी रणांगणीं तीक्ष्ण बाणांनीं जिंकून धर्मराजाच्या पायां पडण्यास लावीन. तसें करण्यास कौरव नाकबूल करतील तर, त्या सर्वांस मारून यमाकडे पाठवीन. वज्राप्रमाणें तीक्ष्ण, असे सात्यकीचे बाण, त्यांच्यानें सहन करवणार नाहींत. त्याप्रमाणेंच अर्जुनानें गांडीव धनुष्य हातीं घेतल्यावर, व श्रीकृष्णानें चक्र घेतल्यावर, कोणाचें कांहीं चालणार नाहीं. तसेच भीम, नकुल, सहदेव, विराट, द्रुपद, धृष्टद्युम्न, व अभिमन्यु, इत्यादि आह्मी सर्व वीर, मिळून धृतराष्ट्राचे पुत्र, शकुनी, व कर्ण, इत्यादि सर्वांस ठार मारून, धर्मराजास राज्यावर बसवूं. दुष्ट शत्रूला मारण्यांत कांहींच अन्याय होत नाहीं. शत्रूंजवळ गरीबांसारखी यांचना करणें यांतच पाप, आणि दुष्कीर्ति आहे. याकरितां सर्वांनीं आळस टाकून धर्मराजाच्या मनांत असेल तेंच करावें; अशी माझी हात जोडून विनंति आहे.

---

## २. शरीरसंपत्ति.

आपल्या सुखाची वृद्धि, आणि दुःखाची निवृत्ति व्हावी, अशी प्राणिमात्रांस इच्छा असते. तथापि मनुष्यांपेक्षां अन्य प्राण्यांची गोष्ट भिन्न असल्यामुळें येथें त्याचा विचार कर्तव्य नाहीं. मनुष्यास बुद्धि, वाचा, व मन, इत्यादि अनेक साधनांची अनुकूलता असल्यामुळें त्याला आपल्या इच्छा तृप्त करण्याचें सामर्थ्य आलें आहे. त्याचा यथाकालीं योग्य रीतीनें उपयोग केल्यास दुःखाचे प्रसंग टाळून सुखसाधनें वाढवितां येतात. ह्या सुखदुःखाची पेटी प्रत्येक मनुष्याजवळ असून, तिची किल्लीही त्याच्या हातीं दिली आहे. ती उघडून सुखाचा किंवा दुःखाचा उपभोग घेणें हें प्रत्येकाच्या कर्तृत्वावर आहे.

ऐहिक सुखदुःखाचा उपभोग आपणास शरीरद्वारा प्राप्त होतो. ह्मणून, शरीरसंपत्तीची विपुलता असावी असें आपण इच्छितों. येथें शरीर शब्दानें नुस्ती ‘ काया ’ घ्यावयाची नाहीं. तर काया, वाचा, आणि मन, इतक्यांची संपन्नता असणें ह्याचें नांव शरीरसंपत्ति असें धरलें आहे. कारण, स्थूलदेहाचे हत्तीसारखे अनेक प्राणी आहेत. त्यांचें शरीर मोठें असून त्यांस मनुष्याच्या शेंकडोंपटीनें बलही ज्यास्त आहे. तरी ह्या साडेतीन हात उंच माणसानें, तसल्या स्थूलदेही, व अतिबलाढ्य, प्राण्यांस जिंकून,

त्याच्या मस्तकावर स्वारी केली आहे. त्यास आज्ञांकित करून हवा ति-कडे फिरवीत आहे. सांखळदंडाच्या बिड्यांनीं बंधन करीत आहे. गंड-स्थलासारख्या मर्मस्थानीं अंकुशानें टोंचीत आहे. हें शौर्य मनुष्याच्या नुस्त्या आंगजोराचें ह्मणजे कायेचें नव्हे, तर हें सामर्थ्य बुद्धि, ज्ञान, व शरीर, इत्यादिकांच्या समुच्चयाचें होय. ह्मणून शरीरसंपत्ति या शब्दांत मनुष्याची काया, वाचा, व मन, ह्या तिहींचा समावेश केला आहे. ही त्रिगुणात्मक संपत्ति प्रत्येकास संपादन करतां येण्याजोगी आहे. ती ज्यास अनुकूल होईल, त्यास ह्या दुनयेंतील सर्व सुखें उपभोगतां येतील, आणि इतरांवर अतोनात उपकारही करतां येतील. परंतु प्रस्तुतकालीं ह्या त्रिगु-णांनीं युक्त, असे संपन्न पुरुष फार क्वचित् आढळतात. जिकडे पाहावें तिकडे एककल्ली तऱ्हा पसरलेली फार दिसते. यामुळें मनुष्यांची ह्मणजे विशेषेंकरून आपल्या हिंदुस्थानांतल्या लोकांची फार हानि होत आहे. आपल्या देशांतील लोकस्थितीकडे नीट अवलोकन करून चांगला वि-चार केला ह्मणजे, आपल्या लोकांचें सगळ्या चांगल्या गोष्टींत पाऊल मागें पडण्यास, हाच दोष बहुतांशीं कारण झाला आहे, असें स्वच्छ दिसूं लागतें. तीन चाकांच्या गाडीचीं दोन चाकें काढून ठेविलीं, आणि एकाबाजूचें एकमात्र चाक गाडीस जोडून तींत पुष्कळ ओझें लादून आपण ओढूं लागलों, ह्मणजे गाडी सरळ न चालतां ती हेलपटूं लागते. त्यायोगें मार्ग-क्रमण होत नसून ओढणाऱ्यास मात्र पराकाष्ठेचे श्रम होतात. आंतल्या ओ-झ्याची आदळआपट होते, आणि त्या एकचाकी गाडीचा, आंतल्या ओझ्याचा, व बिचाऱ्या ओढणाऱ्याचा, सगळा खेळखंडोबा होऊन, बखेडा मात्र होतो ! आमच्या लोकस्थितीमध्यें काया, वाचा, व मन, हे तीन गुण एकत्रपणानें एका मनुष्यांत वृद्धिंगत होत नाहींत. तर, कांहीं लोक शारिरिकश्रमांचीं रात्रंदिवस कामें करून गुजारा करितात. त्यांची काया बळकट, व निरोगी असते. पण मानसिक विचारज्ञानाचा व वाचेचा संस्कार त्यांस मुळींच होत नसल्यामुळें हे गुण स्वभावसिद्ध जेवढे असतात तितकेच खुंटतात. शिक्षणाच्या योगानें त्यांत ज्यास्त भर पडत नाहीं, ह्मणून त्यांचें जिणें पशुतुल्य राहतें. असला वर्ग आमच्या देशांत फारच मोठा आहे. आमचे सगळे शेतकरी, सगळ्या प्रकारचे कारागीर, आणि एकंदर स्त्रियांचा समुदाय, हा सगळा मूर्तिमंत असा आहे. आतां आमच्यां-

तील वरच्या प्रतीचे लोक हे पिढीजादे विद्याव्यसनी आहेत; ते विद्या शिकतात. शाहणे व समजुतदार होतात. पण ते नुसतें मानसिक ज्ञान संपादण्याच्या पाठीस लागल्यामुळें शरीरप्रकृतीची फार हेळसांड करितात. तेणेंकरून त्यांस ज्ञान येतें, पण तें हातीं लागतें न लागतें तोंच शरीर थकतें; यामुळें ते संपादन केलेल्या ज्ञानाचा भार सहन करण्यास व त्याचा उपभोग घेण्यास अशक्य होऊन लवकर मृत्युमुखीं पडतात! जिकडे तिकडे असला एककल्ली व्यवहार चालला आहे, त्यामुळें आपल्या जनसमुदायावर नित्य एकचाकी गाडीप्रमाणें फरपटण्याचा किंवा भलत्याच जागीं कुचंबत बसण्याचा प्रसंग गुदरत आहे.

जे बारा बारा वर्षे एकसारखा विद्याभ्यास करून ज्ञानसंपादन करितात, विद्यामंदिरांतील थोर थोर पदव्या मिळवितात, आणि अभ्यासाची समाप्ति करून, संसाराच्या उद्योगास लागतात; तोंच ह्यांचे हात गुडघ्यावर येतात. कसाल्याचें काम करण्याचा प्रसंग आल्यास ह्यांचा निभाव लागत नाहीं. लवकर थकून आजारी पडतात. इभ्रतीचीं, धारिष्टाचीं, व सहासाचीं, कामें करण्याचा त्यांच्यांत जोम राहत नाहीं. मग शौर्याचीं व दांडगाईचीं कामें ह्यांच्या हातून होण्याची आशा कोठून असणार? दररोज जेवणाची वेळ जरा चुकली कीं लागलेच लंघून जातात. नित्याच्या आहारापेक्षां एखादवेळ दोन घांस ज्यास्त झाले कीं, लागलीच अजीर्ण होतें. पडसें, खोकला, ज्वर, व डोकें दुखणें, हे विकार तर त्यांचे नेहमींचे सोबतीच बनलेले असतात. तात्पर्य, ज्यांस विद्येचा संस्कार बराच होऊन समजूत वाढली असते, त्यांच्या प्रकृति अतिशय नाजूक—ह्मणजे तकलुबी होतात. असलें शरीरदौर्बल्य कोणी मुद्दाम घेतो असें नाहीं. परंतु आमच्यांत शिक्षणाची पद्धतच अशी खराब झाली आहे कीं, विद्याशिक्षणाच्या कालांत नुस्ता विद्याव्यासंग चालतो. शरीरशिक्षण त्याच्या बरोबर द्यावयाची जरूरी असून तें बिलकूल मिळत नाहीं.

आपलें शरीर बालपणीं वाढत असतें, त्या वेळीं हात, पाय, नाक, डोळे, इत्यादि सर्व अवयव एकसारखे वाढत असतात. त्यामुळें सर्व शरीर यथाक्रमें वाढून उपयोगीं होतें. शरीराची वाढ अशा प्रकारें न वाढतां एकच हात, एकच पाय, किंवा दुसरा एखादा अवयव एकएकच वाढला तर विपरीत दिसेल. आणि शरीरव्यापारास मोठी अडचण येईल. कल्पना

करा, एखाद्याचा एकच पाय वाढत जाऊन लांब झाला, आणि दुसरा न वाढतां आंखूडच राहिला, तर चालतांना किती अडचण येईल? परमेश्वरसत्तेनें शरीराचे सर्व भाग यथा प्रमाणानें वाढतात ह्मणून बरें आहे. त्याचा कारभार आमच्या हातीं असता तर सगळी दुर्दशा झाली असती. आपली व आपल्या पोटच्या मुलांची कायिक, वाचिक, व मानसिक, शरीरसंपत्ति अभ्यासानें वाढवावयाची ती अगदीं बरोबर वाढत गेल्यास मोठें हित आहे, ती मागें पुढें किंवा अधिकउण्या प्रमाणानें वाढल्यास मोठी हानि आहे. हें चांगलें समजत असतां देखील आह्मी त्यास जपत नाहीं. यामुळें चांगलीं उपयोगीं पडण्यासारखीं माणसें तयार झाल्यावर त्यांच्यानें लोकोपयोगाचीं कामें करवेनाशीं होतात. ते बिचारे काय करतील. त्यांचा पायाच कच्चा असतो. यामुळें शरीररूप इमारत लवकर ढांसळून पडते. आपण सहा सात मजल्यांच्या उंच इमारती उभ्या करतों. त्यांचा चांगला पाया खोल खणून चुन्यानें व दगडांनीं मजबूत भरला नसला, आणि इमारत वरून चांगली शृंगारली, रंग सुरेख दिला, आंत उंची उंची बिछायती पसरल्या, व मौल्यवान सुशोभित सामान मांडून मोठी रोषनाई केली, तर त्याला बळकटी येईल काय? नाहीं. वरून छानछोक बनविलेली बिनपायाची इमारत फार दिवस न टिकतां मोठ्या जोराचा वारा व पाऊस फार वेळ लागला कीं, ती खास ढांसळून पडेलच पडेल. आमच्यांतील विद्वान लोकांची शरीरसंपत्ति ह्या कच्च्या पायाच्या उंच घरांसारखी असते. यामुळें नेहमीं डाक्टरसाहेबांकडे किंवा वैद्यबावांकडे जाऊन तिची दुरुस्ति करावी लागते.

युरोपांत व अमेरिकेंत नानांप्रकारच्या सुधारणा अतिवेगानें होऊन लोकांचें वैभव वाढत आहे. अशा गोष्टी आपण वाचल्या ह्मणजे आपणास परमाश्चर्य वाटतें. वास्तविक पाहतां तेथलीं मनुष्यें व आपल्या देशांतलीं मनुष्यें एकसारखीं आहेत. मग त्यांचीं सर्व कामें बिनधोक चालतात, आणि आमचीं मात्र वारंवार फसतात. हें पाहून अचंबा वाटतो. याचें कारण फार गूढ नाहीं. अगदीं उघड आहे. त्यांच्यामध्यें काया, वाचा, व मन ह्यांची शक्ति वाढविण्याचें शिक्षण एकाच वेळेस सारख्या प्रमाणानें मिळत असतें. ह्मणून त्यांची त्रिगुणात्मक शरीरसंपत्ति एकदम तयार होते. यामुळें त्यांच्यांत मर्दुमकीचें तेज मोठ्या जोरानें वाढतें,

मानसिक ज्ञानशक्ति ही तशीच जोरानें वर्धन पावून विवेचकशक्ति प्रदीप्त होते. आपल्या मनांतील उद्देश वाणीच्या द्वारें दुसऱ्यांस कळविण्याचीही योग्यता येते. यामुळें त्यांचें कांहींच न्यून पडत नाहीं. जी गोष्ट करण्याचा ते विचार करतात ती इभ्रतीनें शेवटास नेण्याची त्यांच्यांत हिंमत असते. अंगांत पीळ असतो, प्रसंग पडला तर आंगजोरानें उभारलेलें काम शेवटास नेण्याचा दम असतो, यामुळें त्यांचीं सर्व कामें सिद्धीस जातात.

हे गुण आमच्यांत आणण्याची फार आवश्यकता आहे. कारण आमचीं सर्व कामें रेंगाळत चाललीं आहेत. देशांत दरिद्र वाढत आहे, व सर्वप्रकारें पराधीनता आली आहे. अशा अनेक विपत्ति दूर करण्यास चांगला व राजरोस उपाय असा आहे कीं, आपल्या विद्याशिक्षणाच्या क्रमांत फेरफार करून सध्या जो एकमार्गी शिक्षणक्रम चालला आहे, तो दुरुस्त करावा. सध्या नुस्तें मानसिक शिक्षण मात्र मिळतें, त्याचवेळेस बलवर्धन होण्याजोगें शारीरशिक्षणही देण्याचा प्रघात चालू करावा. अशा रीतीनें शिक्षणपद्धति चालू होऊन चांगली प्रचारांत आली ह्मणजे, शारीरबल, व मानसिकबल, एकदम वाढीस लागून बल व ज्ञान वर्धन पावेल. ह्याच वेळेस वाचाशक्ति ही वाढविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कारण प्राप्त झालेलें ज्ञान आपल्या कार्यास लावून दुसऱ्याच्याही उपयोगीं पडण्याची तजवीज झाल्यास अधिक श्रेयस्कर होईल. नद्यांस धरणें बांधून पाणी अडवून धरतात, तें पाटाच्या द्वारें दूरच्या पल्ल्यावर नेऊन शेतास देतात. तेणेंकरून पिकाची समृद्धि होते. आमच्यांत जे ज्ञानसंपन्न पुरुष होतात, त्यांनीं आपल्या ज्ञानसमूहांतील कांहीं अंश तरी अज्ञान व गरीब अशा लोकांस दिला पाहिजे. तो देण्यास वाक्चातुर्यगुण संपादन केला असतां ज्ञानाचा प्रयोग लोकांवर चांगल्या प्रकारें करितां येणार आहे. आमच्यांत पुष्कळ चांगलीं कामें करावयाचीं आहेत. तीं नेटानें आरंभून निश्चयानें शेवटास नेलीं पाहिजेत. तसें करण्यास पूर्वी सुचविल्याप्रमाणें कायिक, वाचिक, व मानसिक, अशी त्रिगुणात्मक शरीरसंपत्ति संपादन करण्याची व्यवस्था सुरू झाली ह्मणजे आपलीं सर्व कामें सुयंत्रपणें चालू होऊन दिवसेंदिवस आपलें पाऊल पुढें सरकूं लागेल. यास्तव सर्व मंडळीस विनंति आहे कीं, असा योग जमवून आणण्याची यथाशक्ति सुरुवात करावी; ह्मणजे परमेश्वरकृपेनें आपले मनोरथ सिद्धीस जातील.

---

# उपक्रम व उपसंहाराचीं उदाहरणें.

## शरीरबल आणि ज्ञानबल.

शरीरबल आणि ज्ञानबल यांत ज्ञानबल हें श्रेष्ठ आहे, ही गोष्ट अनादिकालापासून सिद्ध झालेली आहे. त्याचीं उदाहरणें इतिहासपुराणांतरीं पुष्कळ आहेत; आणखी तीं सर्व सुजाण माणसांस ठाऊक आहेत. तरी, बुद्धिभ्रम, किंवा त्याला पाहिजे तर माया ह्मणावें, ह्याचा प्रभाव एवढा कांहीं चमत्कारिक आहे कीं, चांगल्या चांगल्या माणसांस देखील शरीरबल किंवा बाहुबल हें ज्ञानबलापेक्षां श्रेष्ठ वाटतें. आणि त्याप्रमाणें त्यांचे हातून योजना होतात. आणखी, त्यांचा परिणाम, यथोचित ह्मणजे, नाशकारक असा होतो.

[ येथें कृष्ण, कौरव आणि पांडव ह्यांची गोष्ट, आणि त्यासारख्या दुसऱ्या कांहीं गोष्टी सांगाव्या. ]

ह्यांवरून पहा कीं, बाहुबलापेक्षां ज्ञानबल श्रेष्ठ आहे. मनुष्यानें, आपणांपेक्षां अत्यंत बलवान प्राणी आणि आप, तेज, वायु, आकाश, इत्यादि अत्यंत प्रबल पंचमहाभूतें, ह्या सर्वांस जें आपल्या स्वाधीन करून घेतलें आहे—किंबहुना आपले दास बनवून ठेविलें आहे, तें केवळ त्याच्या ज्ञानबलाचें फल आहे. आणखी, माणसें तेथून सगळीं सारखीं असतां, कांहीं माणसें दुसऱ्या माणसांस आपल्या आज्ञेंत वागावयास लावितात, किंवा त्यांस आपलीं ओझेंलीं घोडीं बनवितात, त्यास मुख्य साधन—किंबहुना सगळें साधन काय तें ज्ञानबल आहे. ह्यास्तव, आपणांस जर दुसऱ्यांहून श्रेष्ठ व्हावयाचें आहे, तर, आपण आधीं त्यापेक्षां ज्ञानबलांत श्रेष्ठ झालें पाहिजे. आणि तें ज्ञानबल जें आहे तें, एकनिष्ठ अध्ययनाचें फल आहे. ह्मणून सांगणें मिळून एवढेंच आहे कीं, पूर्वोक्त माया किंवा भ्रम ह्यांचें पडळ एकीकडे सारून, दिव्यचक्षु उघडून, ज्ञानबल ओळखून तें संपादावें, आणि त्यानें आपण श्रेष्ठ व्हावें. ह्मणजे कालेंकरून आपण घोडीं आहों ते स्वार होऊं, आणि जे स्वार आहेत त्यांना घोडीं बनवूं; पण हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं, हें कार्य ज्ञानबलानें मात्र साधणार आहे. केवळ बाहुबलानें साधावयाचें नाहीं.

## स्वदेशहित.

हित दोन प्रकारचें आहे. ऐहिक आणि पारलौकिक. हीं एकमेकांपासून बरींच भिन्न आहेत; तरी, त्यांमध्यें असा एक चमत्कार आहे कीं, ऐहिकसुखसाधनांत पारलौकिकसुख साधतां येतें; परंतु, पारलौकिकसुख साधण्याचा प्रयत्न करीत असतां ऐहिकसुख साधतां येत नाहीं; एवढेंच केवळ नव्हे, तर, ऐहिकसुखास पुष्कळ अंशीं मुकावें लागतें. ह्मणजे, ऐहिकसुख साधनाची योग्यता पारलौकिकसुखसाधनाच्या योग्यतेपेक्षां मोठी आहे, असें झालें. ह्याच अर्थानें आमच्या एका कवीनें ह्मटलें आहे कीं, " प्रपंच साधुनि परमार्थाचा लाभ ज्यानें केला, तो नर भला भला." आतां प्रपंच साधून परमार्थ कसा साधतां येतो, हें पाहिलें पाहिजे. आपणां सर्वांस ठाऊक आहे कीं, ह्या जगामध्यें जितकीं धर्मशास्त्रें उपलब्ध आहेत, त्या सर्वांतल्या नीतीमध्यें एक मुख्य तत्त्व फार व्यापक आहे, तें असें कीं, परोपकारासारखें पुण्य नाहीं, ह्मणजे, स्वहिताकडे दृष्टि न ठेवितां, दुसऱ्याचें बरें करण्याचा प्रयत्न करणें हें महापुण्य आहे. परोपकार करणें हें ईश्वरी अंशाचें फल आहे. ह्मणूनच, ज्यांनीं आपलें सर्वस्व परोपकारास वाहिलें आहे, त्यांस ईश्वरांशच नव्हे, तर, प्रत्यक्ष परमेश्वराचे अवतार मानण्याचा परिपाठ पडला आहे; आणि तो यथार्थ आहे. त्यांतही एका मनुष्याचें नव्हे, एका कुटुंबाचें नव्हे, एका आळीचें नव्हे, एका गांवाचें नव्हे, एका प्रांताचें नव्हे, तर एका सगळ्या राष्ट्राचें हित—स्वदेश हित करण्यास जे कोणी कायावाचामनेंकरून झटतात, ते खरोखर सर्व माणसांच्या अनुमतानें देव होतात, असें ह्मटल्यास चिंता नाहीं. ह्याचीं उदाहरणें सर्व देशांच्या इतिहासांत विपुल आहेत.

[ शिवाजी, बाजीराव, अकबर, वाशिंगटन, नेल्सन, कोलंबस, इत्यादिकांचीं उदाहरणें सांगावीं; आणि लोकांत त्या त्या लोकांचें देव्हारें केवढें आहे तें सांगावें. ]

ह्यावरून पाहा कीं, प्रपंच साधून परमार्थ साधण्याचा उत्तमोत्तम उपाय ह्मटला ह्मणजे, स्वदेशहित साधण्यास कायावाचामनेंकरून निरपेक्षबुद्धीनें झटणें हा आहे. आणखी, सध्या आपल्या देशाची स्थिति अशी कांहीं चमत्कारिक झाली आहे कीं, मनुष्यास ज्या प्रकारचें सामर्थ्य असेल त्या

त्या प्रकारें त्यास ह्या देशाचें हित करण्यास पाहिजे तितकी जागा आहे. आमच्या धर्मश्रद्धेचा ऱ्हास होत चालला आहे; आमच्या लोकव्यवहार शुद्धीचा ऱ्हास होत चालला आहे; आपल्या कलाकौशल्याचा ऱ्हास होत चालला आहे; आपल्या राज्यव्यवहारसत्तेचा ऱ्हास होत चालला आहे; आपल्या स्वातंत्र्याचा ऱ्हास होत चालला आहे; व आपल्या ऐक्याचा ऱ्हास होत चालला आहे; आणखी आह्मी असें ह्मणतों कीं, प्रपंच साधून परमार्थाचा लाभ करून घेण्यास हे सगळे मोठे पवित्र आणि प्रशस्त असे राजमार्ग आहेत. ह्या राजमार्गांनीं आमच्या मंडळीनें जावें; ह्या मार्गांनीं जे कोणी पूर्वी गेले आहेत, त्यांचें अनुकरण करावें, आणि स्वदेशहित साधून ऐहिक आणि पारलौकिक ह्या दोनही प्रकारच्या सुखांचा लाभ करून घेऊन, जन आणि परमेश्वर ह्या दोघांच्याही स्तुतीस पात्र व्हावें. हेंच जन्माचें सार्थक्य होय.

---

